






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








२८९९

अं. ११३. ११४. ११५. ११६

संपादक - वा. रा. ढवळे

वर्ष २९ वे अंक ११३ एप्रिल - जून १९५५

वर्ष २९ वे अंक ११४ जुलै - सप्टेंबर १९५५

वर्ष २९ वे अंक ११५ ऑक्टोबर - डिसेंबर १९५५

वर्ष २९ वे अंक ११६ जानेवारी - मार्च १९५६

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष २९ वें, अंक ११३ एप्रिल–मे–जून १९५५

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

संपादक

वा. रा. ढवळे

संपादक मंडळ

य. दि. पेंढरकर वा. ल. कुलकर्णी

श्री. के. क्षीरसागर अरविंद गं. मंगरूळकर

डॉ. ना. गो. कालेलकर, निशिकांत करकरे यांचे लेख
श्री. म. माटे, दुर्गा भागवत, अरविन्द मंगरूळकर यांनी
लिहिलेलीं परीक्षणें, संपादकीय, परिषदेचें इतिवृत्त वगैरे.

अनुक्रमणिका



## *अनुक्रमणिका*

# संपादकीय

## ‘ साहित्य पत्रिके ’ चें स्वरूप

नव्या संपादनाखालील हा पहिला अंक. संपादकीय बदल झाल्यामुळे, ‘ पत्रिके ’ च्या स्वरूपांतहि थोडा फार बदल व्हावा हें अपरिहार्यच. तसा तो थोडाफार बदल बहिरंग व अन्तरंग या दोन्हीहि बाबतींत झालेला असल्याचें आढळून येईल; अर्थात् , ‘ पत्रिके ’च्या स्वरूपाबद्दलच्या संपादकाच्या सर्वच कल्पना, वेळेच्या अभावीं, या अंकांत साकारलेल्या नाहीत. पण त्या हळूहळू आकारूं लागतील अशी उमेद आहे.

महाराष्ट्रांतील इतर वाङ्मयीन नियतकालिकांपेक्षा ‘ पत्रिके ’ चें स्वरूप हें भिन्न असायला हवें, अशी अपेक्षा असणें हें चुकीचें नव्हे. महाराष्ट्र साहित्य परिषद् ही मराठी लेखकांची व वाङ्मय-भक्तांची एक मध्यवर्ती संस्था असून, त्या संस्थेचें मुखपत्र हें लेखकांना मार्गदर्शक व त्यांच्या आकांक्षा, भावना व्यक्त करणारें असलें पाहिजे. पण ‘ पत्रिके ’च्या मर्यादित पृष्ठसंख्येमुळे, कविता, कथा, लघुनिबंध, एकांकिका इत्यादि ललित साहित्याचे प्रकार तींत समाधानकारक प्रमाणांत प्रसिद्ध करणें शक्य होत नाही. अर्थात्, हें सर्व ललित वाङ्मय प्रसिद्ध करायला महाराष्ट्रांत आज सुदैवाने कित्येक चांगलीं मासिकें आहेत व वाचकांची कलात्मक भूक भागविण्याचें कार्य हीं मासिकें मोठ्या आस्थेने, आवडीने नि उत्साहाने करीत आहेत. तेव्हा ‘ पत्रिके ’नेहि तेंच करण्यांत फारसें स्वारस्य अगर औचित्य आहे असें नाही. किंबहुना मराठी भाषेंत जें वाङ्मय लिहून आज प्रसिद्ध होतें, त्याचें निर्भीड, मार्मिक नि अचूक मूल्यमापन करणें हें कार्य अधिक महत्त्वाचें आहे. साहित्याचा विकास निरामय पद्धतीने होण्याच्या कामीं अशा प्रकारच्या समीक्षणात्मक लेखनाची आवश्यकता असते. हें कार्य साहित्य परिषदेच्या मुखपत्राने करावयाचें नाही तर कोणी ? गंभीर स्वरूपाचीं वाङ्मयीन नियतकालिकें हीं केव्हांहि व कोठल्याहि देशांत थोडींच असतात. अशीं मासिकें अगर नियतकालिकें नेहमी तोट्यानेच चालवावीं लागतात हा अनुभव एकट्या महाराष्ट्राचाच आहे असें नसून तो इतर देशांचाहि आहे. सर्वसाधारण वाचकांत तीं लोकप्रियहि होत नाहीत. पण तीं तशीं व्हावीं अशी अपेक्षाहि बाळगणें चुकीचें होईल. ‘ दीपगृहा ’ प्रमाणे मार्गदर्शन करणें हेंच त्यांचें ध्येय असतें. ‘ पत्रिके ’ कडून याच मार्गदर्शनाची अपेक्षा केली जावी हें त्या दृष्टीने साहजिकच म्हटलें पाहिजे.

‘ साहित्य अकादमी ’ ही संस्था देशी भाषांच्या सर्वांगीण विकासासाठी व त्यांच्या विकासाला अगर वाढीला उत्तेजन देण्यासाठी स्थापन झालेली आहे. तिचें कार्य अपेक्षेप्रमाणे जितक्या पद्धतशीरपणें व झपाट्याने व्हावयाला पाहिजे तितकें आज होत नसलें तरी कालान्तराने तें होईल अशी आशा बाळगायला हरकत नाही. पण त्याचबरोबर देशी भाषेंतील ज्या प्रातिनिधिक साहित्य संस्था आहेत त्यांनी त्या त्या भाषांच्या व त्यांतील वाङ्मयाच्या विकासासाठी कांहो निश्चित अशा योजना आंखल्या पाहिजेत. या योजनांचें स्वरूप काय असावें, आजच्या वाङ्मयांत कोणत्या उणीवा आहेत, आजच्या वाङ्मयाचीं उपेक्षित दालनें कोणतीं आहेत, त्या उणीवा अगर तीं दालनें भरून काढण्यासाठी कोणते प्रयत्न झाले पाहिजेत,

आपल्या आजच्या साहित्याच्या दर्जाचें स्वरूप काय आहे, त्याची उंची कशी वाढूं शकेल, त्याचा विकास कसा होईल या व इतर आनुषंगिक प्रश्नांचा गंभीरपणाने नि जबाबदारीने ' पत्रिके ' सारख्या नियतकालिकांतून विचार, चर्चा, व्हायला पाहिजे असें वाटतें. म्हणूनच ' पत्रिके 'चें स्वरूप चर्चात्मक, टीकात्मक, संशोधनात्मक, नि समीक्षणात्मक वाङ्मयाच्या प्रसिद्धी पुरतेंच मर्यादित ठेवण्याचें ठरविलें आहे. चार दोन कविता अगर एखादा लघुनिबंध अगर छोटीशी कथा एवढाच ललित मजकूर आजच्या मर्यादित पृष्ठांत ' पत्रिके 'ला देणें शक्य होत होतें. पण तसें करण्याने आजच्या वाङ्मयाचें प्रतिनिधिक दर्शन घडविणें शक्य आहे असें नाही. शिवाय वर लिहिल्याप्रमाणें हें कार्य इतर मासिकें साक्षेपाने करीत आहेतच. याहि दृष्टीने ' पत्रिके 'त कविता, कथा इत्यादि ललित वाङ्मयाचा मजकूर न देतां त्या वाङ्मयाच्या प्रकृतीचीच चर्चा अगर पहाणी तींत करणें हें स्वागतार्ह वाटतें. महाराष्ट्रांतील विचारवन्त लेखकांचें व टीकाकारांचें अपेक्षित सहकार्य मिळाल्यास हें धोरण यशस्वी होणार आहे.

## साहित्यिक शिबिराच्या निमित्ताने

हिन्दींतील प्रसिद्ध कवयित्री श्रीमती महादेवी वर्मा यांच्या नेतृत्वाखाली ' साहित्यकार संसद ' या नांवाची एक संस्था उत्तर प्रदेशांतील हिन्दी लेखकांनी अलाहबाद येथे स्थापन केलेली आहे. या संस्थेच्या वतीने गेल्या जून महिन्यांत नैनितालजवळच्या ताकूला टेकडीवर भारतांतील साहित्यिकांचें एक शिबिर भरविण्यांत आलें होतें. लेखकांचीं प्रतिवर्षी संमेलनें करणें, साहित्यचर्चा करणें, पुस्तकें प्रसिद्ध करणें वगैरे या संस्थेचे उद्देश आहेत. हें शिबिर जवळ जवळ एक महिना चाललें होतें. कलकत्ता, मद्रास, बनारस, अलाहबाद, वगैरे ठिकाणचे अनेक प्रसिद्ध लेखक या शिबिरांत दाखल झाले होते. महाराष्ट्रांतून नाटककार श्री. भा. वि. वरेरकर व कवि श्री. वा. भ. बोरकर यांना खास निमंत्रण देऊन बोलाविण्यांत आलें होतें. या दोन्हीहि लेखकांनी तेथील साहित्यविषयक चर्चेत महत्त्वाचा भाग घेतला. ' साहित्य कां व कोणासाठी ? '' या विषयावर चर्चा ठेवण्यांत आली होती. अध्यक्ष या नात्याने श्री. वरेरकर यांनी हिन्दींतूनच या चर्चेचा समारोप केला हें विशेष होय. याच शिबिरांत श्री. वरेरकर यांच्या प्रेरणेने ' रंगवाणी ' या संस्थेची स्थापना करण्यांत आली असून, अखिल भारतीय रंगभूमीच्या साहाय्यानं हिन्दी रंगभूमीची ऊर्जितावस्था व विकास घडवून आणण्याचें कार्य ही संस्था करणार आहे. या संस्थेच्या अध्यक्षपदीं श्री. वरेरकर यांची योजना झाली ही घटना जितकी औचित्यपूर्ण तितकीच ती महत्त्वाची होय. हिन्दी साहित्यिकांच्या शिबिरांत श्री. वरेरकर व श्री. बोरकर हे मराठी साहित्यिक चमकले हें वृत्त मराठी लेखकांना अत्यन्त अभिमानास्पद वाटावें असेंच आहे यांत शंका नाही.

अशा शिबिराची कल्पना ही अगदी या प्रान्तांत अभिनव आहे असें नाही. गेलीं कांही वर्षे श्री. ना. गो. चापेकर यांच्या निमंत्रणावरून महाराष्ट्रांतील कांही वाङ्मयसेवक बदलापूरला खुद्द श्री. चापेकरांच्या घरीं प्रतिवर्षी एकत्र येऊन वाङ्मय–चर्चा करीत असत. आचार्य प्र. के. अत्रे यांच्या खंडाळा येथील निवासस्थानींहि पुण्या-मुंबईचे कांही साहित्यिक वर्षांतून एकदा जमून काव्य-शास्त्र-विनोदांत वेळ घालवीत असत. या प्रथा आता चालू नसाव्यात असें वाटतें. पण अलिकडे गेलीं तीन वर्षे महाराष्ट्रांतील कांहीं विचारवन्त लेखक प्रतिवर्षी एखाद्या सोयीस्कर ठिकाणीं एकत्र येऊन साहित्यविषयक प्रश्नांची पद्धतशीर चर्चा करीत आलेले आहेत. यांतील कांही चर्चा प्रसिद्धहि झालेल्या आहेत.

## साहित्य-संमेलनाचें एग्युमिक्श्वर

दरवर्षी भरणाऱ्या साहित्यसंमेलनांत ठिकठिकाणचे लेखक एकत्र येतात हें खरें आहे. पण महत्त्वाच्या साहित्यचर्चेपेक्षा अवान्तर सोहळ्यामध्येच असल्या संमेलनांचा बहुतेक वेळ खर्च होतो. शिवाय संमेलनाचा दोन–तीन दिवसांचा कार्यक्रमहि इतका घाईचा नि गर्दीचा असतो की, निवांतपणाने एकत्र येऊन साहित्यचर्चा अगर विचारविनिमय करण्याइतकी सवड कोणालाच नसते. त्या दृष्टीने वरील सारखे खाजगी प्रयत्न अगर शिबिरासारखे जाहीर उपक्रम हे साहित्याचा दर्जा उंच करण्यास निश्चित उपकारक ठरावेत असें वाटतें. साहित्य संमेलनें—मग तीं प्रादेशिक असोत अगर मोठीं असोत हीं अगदी ठराविक सांच्याचीं अलिकडे होत चाललेलीं आहेत. असल्या संमेलनांचें अध्यक्षपद स्वीकारून जो ताप अगर मतस्ताप होतो त्यापेक्षा निवान्तपणें घरीं बसूनच साहित्य-निर्मिती करणें अधिक इष्ट होय असें वाटल्यावरूनच श्री. वि. स. खांडेकर यांनी असल्या संमेलनांना यापुढे उपस्थित न राहण्याचा आपला निर्णय डोंबिवली येथील साहित्य संमेलनाच्या समारोपाच्या भाषणांत जाहीर केलेला असावा. 'परोपदेशे पांडित्यम्' या स्वरूपाचीं उद्घाटकांचीं भाषणें, गर्दी जमवील असा विषय निवडून त्यावर घडवून आणलेली मनोरंजक (!) चर्चा, काव्यगायन व करमणूक म्हणून एखादें नाटक असें साहित्य संमेलनांचें ' एग्युमिक्श्वर ' होऊन राहिलें आहे. हें या संमेलनांचें स्वरूप यापुढे असेंच चालू ठेवावयाचें काय हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. डॉ. कान्होबा रणछोडदास कीर्तीकर यांच्या वेळच्या कविसंमेलनाच्या कल्पना अगर विष्णु मोरेश्वर महाजनी यांच्या काळच्या साहित्य-संमेलनाच्या कल्पना आपण आजच्या काळांत तशाच चालू ठेवणार आहों काय ? अजूनहि कविसंमेलनाचे अध्यक्ष कवीच निवडले जाणार आहेत काय ? कवि जर काव्य-शास्त्राचा मर्मज्ञ जाणकार असेल तर त्याला कविसंमेलनाचा अध्यक्ष निवडायला कांहीच आड-काठी असूं नये. पण कविसंमेलनासाठी कवीच अध्यक्ष म्हणून निवडला जावा असा आग्रह असण्याचें कारण नाही ! पूर्वी काव्याचें कौतुक फक्त कवीच करीत त्यावेळीं कवि अध्यक्षपदावर बसविणें ठीक होतें. पण आजचा टीकाकार हा अधिक आत्मीयतेने नि शास्त्रीय दृष्टिकोनांतून काव्याची व त्याच्या प्रकृतीची चर्चा करूं लागलेला असल्यामुळे कविसंमेलनाला व खुद्द कवींना त्याचें मार्गदर्शन मिळाल्यास कवितेची प्रकृति सुधारायला मदतच होईल. शिवाय एखाद्या कवीच्या काव्याचा गौरव करावयाचा असेल तर त्याला अध्यक्ष करूनच तो होतो, ही कल्पना आतां जुनी झालेली आहे ती बदलली पाहिजे. कविसंमेलनांत अगर साहित्य संमेलनांत कवींचा व सर्जनशील लेखकांचा स्वतंत्र रीतीने गौरव करायला कांहीच प्रत्यवाय नाही. संमेलनांनी तो जाहीररीत्या अवश्य करावा.

मराठी भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्धीसाठी प्रयत्न करणें, उपाय योजनें, व इतर रीतीनें झटणें आणि त्यांच्या अभ्यासास प्रोत्साहन देणें हे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे प्रधान उद्देश आहेत. हे उद्देश साध्य होण्याच्या दृष्टीनेच दरसाल ठिकठिकाणीं साहित्य संमेलनें भरवि-ण्यांत येतात. लोकांत उत्साह निर्माण करण्याच्या दृष्टीनें संमेलनांचें आजवरचें स्वरूप हें योग्यच होतें. पण आतां मराठी भाषेबद्दल लोकांत उत्साह, अभिमान, आत्मीयता भरपूर निर्माण झाली आहे, इतकेंच नव्हे तर तिचा अभ्यास करण्याची तरतूद. शाळा, कॉलेजें, विश्वविद्यालयें यांच्या अभ्यासक्रमांत सर्वत्र करण्यांत आलेली आहे. अशा परिस्थितींत लोकांच्या मनांत निर्माण झालेल्या उत्साहाचें, साहित्याच्या विकासाच्या दृष्टीने नियोजन कसें करावयाचें व अभ्यासा-

च्या बाबतींत योग्य मार्गदर्शन काय असावें हें कार्य साहित्य संमेलनांनी आतां करणें कालाच्या दृष्टीने क्रमप्राप्तच झालें आहे. शास्त्रीय साहित्याच्या बाबतींत जसें नियोजन करतां येईल तसें ललित साहित्याच्या निर्मितीच्या बाबतींत नियोजन करणें शक्य नाही, हें मान्य केलें तरी ललित साहित्याच्या प्रकृतीचा शास्त्रशुद्ध व तंत्रशुद्ध विचार करण्यानं ललित साहित्याचा तोटा होईल असें थोडेंच आहे ? हें कार्य साहित्य संमेलनांना वरील प्रमाणें शिबिरें उघडून अगर लेखकांचीं लहान लहान संमेलनें, बैठकी घडवून आणून करावयाचें की अन्य प्रकारें करावयाचें हें ठरविण्याची वेळ आलेली आहे. लोकांच्या प्रातिनिधिक साहित्य संस्थांनी हें कार्य अंगावर घेतलें पाहिजे हें जितकें खरें आहे, तितकेंच हें कार्य नेटाने व भरीवपणाने व्हावयाला हवें असेल तर प्रांतिक सरकारांनी या कार्यास सढळ हातांनी आर्थिक साहाय्य देणें हें तितकेंच आवश्यक आहे. स्वतंत्र भारतांत साहित्य, संस्कृति व कला यांची जोपासना व अभिवृद्धि करण्यासाठी साहित्य अकादमीसारख्या संस्था, प्रांतिक सरकारें व मध्यवर्ती सरकारचें शिक्षणखातें यांनी आर्थिक साहाय्य करावयाचें नाहीं तर कोणी ? असें साहाय्य मिळाल्यास साहित्य संस्थांना वरील सारखीं शिबिरें अगर विचारवन्त लेखकांचीं लहान प्रमाणावर संमेलनें भरवितां येतील व त्या शिबिरांच्या अगर छोट्या मेळाव्यांच्या सहकार्याने मराठी भाषा व साहित्य यांच्या पद्धतशीर विकासाच्या योजना आंखून पार पाडतां येतील. आर्थिक बळ आल्यास महाराष्ट्रांतील बौद्धिक बळ एकत्र आणण्यास फारसा विलंब लागणार नाही, असें वाटतें.

## अश्लील वाङ्मयाच्या मर्यादा

अलीकडील काळांत अश्लील वाङ्मयाबद्दलच नव्हे, तर अश्लील चित्रकला, अश्लील शिल्पकला वगैरेसंबंधी पुष्कळ चर्चा अगर खटले झालेले आहेत. त्या दृष्टीने श्री. मर्ढेकरांची कविता, श्री. पदमसी यांची चित्रकला हीं त्यांतून ताऊन सुलाखून निघालेलीं आहेत. अश्लील हें शब्दांत, चित्रांत अगर शिल्पांत नसून तें मनांत असतें ह्या ह्मणण्यांत बराच अर्थ आहे. गेलीं कित्येक वर्षें मराठी वाङ्मयांतील अश्लील म्हणून समजल्या जाणाऱ्या उताऱ्यांचें संकलन करण्याच्या उपद्व्यापांत कांहीं मंडळी गुंतलेलीं आहेत. अशा उताऱ्यांच्या अश्लीलतेबद्दल शंका असली तरी या मंडळींच्या प्रामाणिकपणाबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाही. हेतु शुद्ध असूनहि पुष्कळ कार्यें उपद्व्यापाच्या सदरांत येत नाहीत असें थोडेंच आहे ? खाजुरावोच्या नग्न शिल्पकलेवर अलीकडे बाबू पुरुषोत्तमदासजी टंडन यांच्यासारख्या कॉंग्रेसच्या माजी अध्यक्षांनी आक्षेप घेतल्याचें अनेकांच्या वाचनांत आलें असण्याचा संभव आहे. टंडनजींच्या हेतूबद्दल अगर प्रामाणिकपणाबद्दल कोण शंका घेईल ? पण कलेच्या मूल्यमापनाच्या बाबतींत ही दृष्टि अगर मूल्यांची ही गल्लत योग्य आहे काय हा प्रश्न आहे. चर्चा होते अगर मतभेद होतात ते याच दृष्टिकोनामुळे, अश्लील कशाला म्हणायचें याच मुद्यावर. नीति आणि कला यांचा हा झगडा फार पुरातन कालापासून चालत आलेला आहे.

अश्लील वाङ्मयाच्या आयातीवर प्रवेशबन्दीचे हुकूम अर्थखात्याच्या मंत्रालयाने ( Ministry of Finance ) नुकतेच जारी केले आहेत असें समजतें. मुलांच्या विकसनशील मनावर असल्या वाङ्मयाचे दुष्परिणाम होतात, या ओरडींत बरेच तथ्य असल्यामुळे, या हुकुमांच्या विरुद्ध ओरड करण्यांत फारसें स्वारस्य आहे असें नाही. पण हे हुकूम अंमलांत आणतांना मोठीच अडचण निर्माण होणार आहे. कारण अश्लील कशाला म्हणायचें या बाबतींत निश्चित अशी व्याख्या झालेली नसल्यामुळे, अमुक एक गोष्ट अयोग्य अगर अनिष्ट आहे अगर

अनैतिक आहे या मूल्याने अगर निकषाने ती अश्लील आहे असें ठरविलें जाण्याचा धोका आहे. शेवटीं प्रवेशबन्दीचे हुकूम अंमलांत आणणाऱ्या अधिकाऱ्यांच्या वैयक्तिक दृष्टिकोनावरच अश्लील कोणतें आणि श्लील कोणतें हें ठरविलें जाईल. त्यामुळे मूठभर अधिकाऱ्यांच्या हातांत आलेल्या सत्तेचा अगदी प्रामाणिकपणाने अगर सद्धेतूनेसुद्धा दुरुपयोग होण्याचा धोका आहे.

पण त्याला इलाज काय ? अश्लीलतेचा हा प्रश्न फक्त भारतालाच भेडसावीत आहे असें थोडेंच आहे ? जगांतील इतर देशांतमुद्धा कमी अधिक प्रमाणांत या प्रश्नाचा खल अगर विचार होतच आहे. या दृष्टीने आस्ट्रेलियांतील सांस्कृतिक स्वातंत्र्य समितीने एक निवेदन नुकतेंच प्रसिद्ध केलेलें आहे. तें या प्रश्नाची सोडवणूक करण्याच्या दृष्टीने मार्गदर्शक व्हावें. तें सबंध निवेदन मराठी लेखकवाचकांच्या विचारार्थ येथे उद्धृत करणें इष्ट वाटतें. या बाबतींत कोणाला कांही विचार व्यक्त करावयाचे असल्यास 'पत्रिकें'त त्यांनी मांडावे. योग्य वाटल्यास त्यांना प्रसिद्धि देण्यांत येईल. शक्य तों सूत्ररूपाने विचार प्रकट केले जावे.

## अश्लील वाङ्मयासंबंधी

" ऑस्ट्रेलियांतील सांस्कृतिक स्वातंत्र्य-समितीची कार्यकारणी अश्लील प्रकाशनाच्या प्रश्नासंबंधीचा आपला दृष्टिकोन पुढील शब्दांत व्यक्त करूं इच्छिते.

( १ ) तंत्रदृष्ट्या निमंत्रण हें अनिष्ट आहे आणि परदेशांतून आयात होणाऱ्या प्रकाशनांखेरीज इतर प्रकाशनांच्या बाबतींत त्याची अंमलबजावणीहि कठीण आहे. यासंबंधीच्या परस्परविरोधी मतांचा समतोलपणें विचार करतां कस्टमची तपासणी आणि परदेशांतून आयात होणाऱ्या प्रकाशनांवरील नियंत्रण ह्या गोष्टी, आमच्या मतें, सयुक्तिक ठरतील.

( २ ) एतद्देशीय प्रकाशनाबाबत नियंत्रण अनवश्यक; परंतु कायदेभंग केल्यास न्यायालयांत खटला करण्याचा अधिकार. असें सुचविलें जातें. की एखादें परीक्षा-मंडळ किंवा न्यायालयीन चौकशी पद्धतीचें संरक्षण जिच्यांत दिलें जात नाही, अशी एखादी नियंत्रक सत्ता ही न्यायालयाइतकी समाधानकारक नाही . परंतु अशा एखाद्या परीक्षा-मंडळाचा निकाल विरुद्ध गेल्यास न्यायालयाकडे दाद मागण्याचा जर हक्क दिला गेला तर वरील आक्षेपांतील धार कमी होईल. ज्याने दिलेला अश्लीलतेसंबधीच्या प्रश्नाचा निर्णय नेहमी जगन्मान्य होईल असें न्यायालय सांपडणें अशक्य आहे, हें मान्य करावेंच लागेल. परंतु अश्लील प्रकाशनाविरुद्ध कोणत्याहि प्रकारचे निर्बन्ध घालावयाचे नसतील तर, हा धोका पत्करावाच लागेल- आणि जर हा धोका पत्करावयाचा असेल तर, तो एखाद्या न्यायालयाचाच पत्करणें बरें.

( ३ ) राज्यांतील विद्यमान कायद्यामध्ये, हवी तर लैंगिकता, क्रौर्य किंवा भयानकता यांना खालच्या पातळीवरून राबविणाऱ्या प्रकाशनाच्या संबंधीच्या कायद्यांची भर घालून त्या सर्वांची सुजाण अंमलबजावणी करणें, हाच असा कठीण आणि दुष्कर प्रश्न सोडविण्याचा अधिकांत अधिक व्यवहार्य मार्ग होय.

लैंगिकता हा विषय मुळी अमंगळ मानतांच कामा नये. असें मानणें हें स्त्रीच्या उदरीं जन्माला आलेल्या प्रत्येक स्त्रीच्या आणि प्रत्येक पुरुषाच्या बाबतींत ढोंग ठरतें. वाङ्मयांतून लैंगिकता वगळणें हा शुद्ध वेडेपणा ठरेल. मात्र रोगट भाव चाळविण्यासाठी हा विषय राबविला जातां कामा नये. आणि त्याची प्रतिष्ठाहि कमी होता कामा नये.

ग्रंथ आणि इतर प्रकाशनें यांवरील कोणत्याहि प्रकारच्या नियंत्रणाने भयानकता आणि क्रौर्य हीं नाहींशीं होणें शक्य नाही. जीवनांत भयानकता आणि क्रौर्य अस्तित्वांत नाही असें ढोंग करणें आणि वाङ्मयांतून त्यांना हद्दपार करणें हा शुद्ध मूर्खपणा होय.

कायदा तयार करतांना ' खालची पातळी ' हा शब्दप्रयोग घालून उपयोग होणार नाही. मात्र ( लैंगिकता, भयानकता आणि क्रौर्य यांवर ) ' वाजवीपेक्षा अधिक भर ' हा शब्दप्रयोग घालणें हें हितावह ठरेल. अर्थात्, या कायद्याचा अर्थ कसा लावावयाचा हें शेवटीं न्यायालयावरच सोंपविलें जाईल. परंतु असा अधिकार कोणाला ना कोणाला तरी देण्याचा धोका पत्करलाच पाहिजे. ''

वा. रा. ढवळे

## सूचना

'साहित्यपत्रिके'च्या संपादनासंबंधीचा सर्व पत्रव्यवहार ' श्री. वा. रा. ढवळे, १२६ डी फणसवाडी-मुंबई २. '' या पत्त्यावरच करावा. परीक्षणासाठी पोस्टाने पाठवावयाचीं पुस्तकें-हि वरील पत्त्यावरच पाठवावीं. स्थानिक लेखक-प्रकाशकांनीं मात्र आपले लेख अगर प्रकाशनें साहित्य परिषदेच्या टिळक रोड, पुणें येथील कार्यालयांत पोंचतीं करावीं. लेखाबरोबर पुरेशीं पोस्टाचीं तिकिटें न आल्यास लेख परत केले जाणार नाहींत.

अनुक्रमणिका

# भाषेचा अभ्यास

'ध्वनि-विचार' हें डॉ. ना. ग. कालेलकर यांचें पुस्तक पुण्याची डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट व रिसर्च इन्स्टिट्यूट ही संस्था प्रसिद्ध करीत आहे. त्याला लेखकाने लिहिलेल्या प्रस्तावनेंतील कांही भाग येथे दिला आहे. तशी परवानगी दिल्याबद्दल वरील संस्थेचे संचालक डॉ. कत्रे यांचे आम्ही आभारी आहों.—संपादक

* * *

एका विशिष्ट ध्वनिपरंपरेचा उपयोग करून प्रत्येक मानवसमाज आपले व्यवहार करीत असतो; या ध्वनिपरंपरेला भाषा असें नांव आहे. कालांतराने इतर सामाजिक संस्थांप्रमाणें हे परंपरागत ध्वनीहि एका विशिष्ट क्षेत्रमर्यादेंत एका निश्चित दिशेने बदलतात; पण एकत्र व्यवहार करणाऱ्या समाजांत ते सारख्या प्रमाणांत बदलत असल्यामुळे आणि ही बदलण्याची क्रिया अतिशय मंद गतीनें आणि नकळत होत असल्यामुळे समाजाचें जीवन कोणताहि अडथळा उत्पन्न न होता अबाधितपणें चालू राहतें. यावरून हें दिसून येईल की, विचार व्यक्त करून व्यवहार चालविण्यासाठी उपयोगांत आणल्या जाणाऱ्या या भाषानामक सामाजिक संस्थेचा अभ्यास करावयाचा असेल, तर ज्या ध्वनींचा उपयोग भाषा करते, ते कसे उत्पन्न होतात आणि केव्हा, कुठे व कसे बदलतात, याचें ज्ञान आपण आधी करून घेतलें पाहिजे. शरीररचनेचें ज्ञान हा ज्याप्रमाणें वैद्यकशास्त्राचा, त्याचप्रमाणें ध्वनिज्ञान हा भाषाशास्त्राचा पाया आहे.

अशा परिस्थितींत एकदम भाषाविषयक प्रश्नांची चर्चा करण्याच्या भरीस न पडता अथवा शब्दांच्या व्युत्पत्तीच्या प्रदेशांत पूर्व तयारीशिवाय पाऊल टाकण्याच्या भानगडींत न पडता, या शास्त्राच्या अभ्यासाला पायापासून सुरवात करणेंच योग्य ठरेल.

भाषेंत वापरल्या जाणाऱ्या मूलभूत ध्वनींना वर्ण असें म्हणतात. या वर्णांचा अभ्यास दोन प्रकारें होऊं शकतो. एक अभ्यास वर्णांचें उच्चारानुसार वर्गीकरण करून ते कसे उत्पन्न होतात याचा : हा वर्णांच्या स्थिर स्वरूपाचा अभ्यास होय. दुसरा अभ्यास एकाच भाषेंतील वर्णांच्या उच्चारक्रियेंत कालांतराने बदल होऊन त्या ठिकाणीं दुसरे वर्ण कसे येतात याचा. पहिल्या अभ्यासांत स्थैर्य या तत्त्वाला प्राधान्य आहे; प्रत्येक क्रियेला अपरिहार्य असणाऱ्या काल या तत्त्वाचें अस्तित्व लक्षांत न घेता आणि कालगतीमुळे व्यवहारांतील घटनांमध्यें घडून येणाऱ्या स्थित्यंतराचा अभाव गृहीत धरून केलेला वर्णनात्मक अभ्यास हा स्थैर्यप्रधान अभ्यास होय. दुसऱ्या अभ्यासांत हें प्राधान्य स्थित्यंतराला दिलेलें आहे. एका विशिष्ट प्रदेशांतल्या एका विशिष्ट काळच्या भाषेचा ती स्थिर आहे असें मानून जो अभ्यास होतो, त्यांत त्या भाषेच्या त्या काळच्या स्वरूपाचें वर्णन देण्यांत येतें. प्रत्येक भाषेचें स्वरूप हें ती भाषा ज्या वर्णांचा उपयोग करते त्या वर्णांनी निश्चित होतें. या वर्णांची संख्या व उच्चारपद्धति निश्चित असते. कोणत्याहि भाषेचें एखाद्या विशिष्ट काळांतील व्याकरण लिहितांना त्या भाषेला स्थिर मानूनच तिचें वर्णन करावें लागतें. म्हणून पहिल्या प्रकारचा अभ्यास स्थैर्यप्रधान वर्णनात्मक व एककालिक

असतो. एखाद्या भाषेंत एखाद्या कालखंडांत घडून येणाऱ्या परिवर्तनांचा तो इतिहास नसून, एखाद्या कालबिंदूवरील स्थिरप्राय वाटणाऱ्या भाषेचें तें चित्र असतें.

दुसऱ्या प्रकारचा अभ्यास हा गतिप्रधान असून त्यांत एका विशिष्ट कालबिंदूपासून दुसऱ्या एका कालबिंदूला पोंचेपर्यंत भाषेच्या ध्वनींत जीं परिवर्तनें होतात आणि भाषेंत त्यामुळे ज्या घडामोडी होतात, त्यांचा इतिहास असतो. अशा रीतीने पहिला अभ्यास स्थैर्य-प्रधान तर दुसरा गतिप्रधान असतो; पहिल्या अभ्यासांत भाषा स्थिर आहे असें मानलें जातें, तर दुसऱ्यांत भाषेच्या स्वाभाविक गतिमान् किंवा प्रवाही स्वरूपावर भर दिलेला असतो; म्हणून दुसऱ्या प्रकारच्या अभ्यासाला ऐतिहासिक किंवा (तो दोन कालबिंदूंनी मर्यादित केला गेला असल्यामुळे) द्वैकालिक अशी संज्ञा आहे. केवळ ज्ञानेश्वरीचा अभ्यास करून त्या काळचे मराठीचे ध्वनि व व्याकरण यांचें ज्ञान करून घेणें हा एककालिक, स्थैर्यप्रधान आणि वर्णनात्मक अभ्यास होय; पण ज्ञानदेवांपासून एकनाथ, तुकाराम, मोरोपंत इत्यादिकांच्या काळापर्यंत मराठीचें स्वरूप कसकसें बदलत गेलें हें पाहणें हा द्वैकालिक, गतिप्रधान आणि ऐतिहासिक अभ्यास होय.

जुन्या साहित्याच्या अभ्यासाच्या निमित्ताने फार प्राचीन काळापासून आपल्याकडे व्युत्पत्ति या विषयाला बरेंच महत्त्व आलेलें आहे. किंबहुना व्युत्पत्ति म्हणजेच भाषाशास्त्र, अशी अनेक लोकांची समजूत असते. वास्तविक व्युत्पत्ति ही वर सांगितलेल्या ध्वनींच्या ऐतिहासिक अभ्यासाची एक शाखा होय. आज भाषेंत रूढ असलेला एखादा शब्द (म्हणजे एक विशिष्ट कल्पना व्यक्त करणारा ध्वनिसमुच्चय) अमुक एका काळीं ध्वनिरूपाने कसा होता हें सांगणें म्हणजे त्या शब्दाची व्युत्पत्ति देणें. आज ज्या ध्वनींनी 'पान' किंवा 'वारा' ही कल्पना आपण व्यक्त करतों त्या ध्वनींचें तुकारामकाळीं, ज्ञानदेवकाळीं, पांचव्या शतकांत, बुद्धकाळीं अथवा वेदकाळीं काय स्वरूप होतें, हें ज्या शास्त्राच्या मदतीने आपणांला कळतें तें व्युत्पत्तिशास्त्र. थोडक्यांत व्युत्पत्ति म्हणजे शब्दांतील ध्वनींचा इतिहास.

जुने ग्रंथ वाचण्यासाठी भिन्नभिन्न काळांतील स्वरूपाचें ज्ञान असणें आवश्यक आहे. परंतु केवळ लिपि शिकून हें ज्ञान होणार नाही, कारण ध्वनी बदलले तरी जुनी लिपि आणि लेखनपद्धति कायम ठेवण्याकडेच रूढिप्रिय समाजाची प्रवृत्ति असते. 'ज्ञान' असा लिहिला जाणारा शब्द मराठींत उच्चारदृष्ट्या 'द्न्यान्' असा आहे, म्हणजे त्याचें मूळ 'ज्+ञ+आ+न्' याच्यापासून तो कितीतरी दूर गेलेला आहे. ही गोष्ट दृष्टीआड करून होणारा भाषेचा अभ्यास अशास्त्रीय होईल हें उघड आहे. उच्चार हाच भाषेचा खरा पुरावा होय. म्हणून जुन्या काळची भाषा लेखनरूपाने उपलब्ध झाली, तरीहि त्या काळीं ती कशी उच्चारली जात असे याचें ज्ञान नसेल, तर भाषेच्या अभ्यासाला फारशी मदत होणार नाही.

थोडक्यात म्हणजे एखाद्या विशिष्ट काळचें व्याकरण शिकण्यासाठी, जुन्या ग्रंथांचा अभ्यास करण्यासाठी, प्राचीन काळापासून आजपर्यंत जी भाषिक परंपरा बाह्यतः भिन्न होत गेली असूनहि अखंडित राहिली आहे तिचें ज्ञान करून घेण्यासाठी ध्वनींच्या या द्विविध अभ्यासाची आवश्यकता आहे.

ध्वनिविचाराचें हें महत्त्व पाहिल्यावर भाषा किंवा साहित्य शिकवणारांना त्याचें ज्ञान असणें किती अपरिहार्य आहे, हें दिसून येतें. तसेंच या विषयाचें स्वरूप पूर्णपणें शास्त्रीय आहे, हेंहि त्याचा नीट अभ्यास केल्यावर लक्षांत येतें. ध्वनिपरिवर्तनाचा अभ्यास करून एका विशिष्ट भाषेंत आज अस्तित्वांत असलेल्या ध्वनींचा इतिहास आपण नक्की केल्यावर एखाद्या शब्दाची

व्युत्पत्ति पाहतांना वितंडवादाला जागा राहता कामा नये. असें असूनसुद्धा अनेक ओढाताणीच्या व्युत्पत्ती सुचविल्या जातात आणि ग्राह्य मानल्या जातात. वस्तुतः आज मराठींत वापरला जाणारा एखादा शब्द (परभाषेंतून उसने घेतलेले शब्द सोडून) व त्या शब्दाचें प्राचीन स्वरूप यांच्यांतील परिवर्तनाचे टप्पे निश्चित असले पाहिजेत. मात्र हे टप्पे ठरविण्यापूर्वी आज मराठी भाषेंत किती व कोणते ध्वनी आहेत आणि मराठींत आज उपयोगांत आणला जाणारा एखादा ध्वनि कोणकोणत्या अवस्थांमधून त्याच्या प्रचलित स्वरूपापर्यंत येऊन पोंचला आहे, यांचें पूर्ण ज्ञान करून घेतलें पाहिजे. उदाहरणार्थ, मराठींतील क हा स्फोटक घ्या. तो शब्दाच्या आरंभीं असल्यास मूळ कोणत्या ध्वनीपासून येतो, शब्दाच्या मध्यें असल्यास कोठून येतो व शब्दाच्या शेवटीं कोठून येतो, हें भाषेच्या इतिहासाचा अभ्यास करून नक्की केलें पाहिजे. कान, चाक, पिकणें, भीक, इत्यादि शब्दांत एक वाटणारा क हा वर्ण ऐतिहासिक दृष्ट्या मुळांत किती भिन्न असलेल्या वर्णापासून अथवा वर्णसमुच्चयांपासून आलेला आहे, हें अभ्यासकाला दिसतें आणि मूळ वर्णांच्या परिवर्तनाचा नियमितपणाहि त्याच्या लक्षांत येतो.

सामाजिक संस्थांचा आणि तद्विषयक शास्त्रांचा अभ्यास करतांना तो ऐतिहासिक दृष्टीने केला तरच अभ्यासूंना आणि विद्यार्थ्यांना मार्गदर्शक ठरतो. पूर्वी कोणत्या घटना घडल्या आणि तदनुसार एखाद्या विशिष्ट सामाजिक संस्थेचें स्वरूप कसें बदलत गेलें याचें योग्य ज्ञान आपण मिळवलें, तरच आज त्या सामाजिक संस्थेचें स्वरूप असें कां, या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर आपल्याला देता येईल. पूर्वग्रहदूषित दृष्टीने इतिहासाचा खरा अभ्यास होणें शक्य नाही.

उदाहरणार्थ, प्रत्येक शब्दाचें मूळ शक्य तोंवर संस्कृतपर्यंत नेऊन भिडवण्याची संवय पाहा. या संवयीमुळे आपण बरेच वेळां सत्यापासून दूर जातों. ' हिंदुस्तान ' हा शब्द ' हिंदुस्थान ' असा लिहून मग ' हिंदु ' शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल निरर्थक वादविवाद झालेले आपण वाचतों. हा शब्द भाषेंत प्रथम कां, कधी व कुठे आला याच्याकडे आपण लक्ष दिलें, तर आपणांकडून हास्यास्पद चुका होणार नाहींत. ठराविक अर्थाने रूढ झालेल्या एखाद्या शब्दाचें स्वरूप निश्चित असलें पाहिजे; मग तें योग्य पुराव्याच्या अभावीं आपल्याला सांपडलें नाहीं तर इलाज नाही. 'पान' हा शब्द म्हणजे अर्थवाहक ध्वनिसमुच्चय 'पर्ण' या शब्दापासून आला आहे. तो 'पण्य' या शब्दापासून आला आहे असा व्यर्थ वाद आपण घालत नाही; कारण ऐतिहासिक दृष्टीने, म्हणजे एक विशिष्ट अर्थ व्यक्त करणाऱ्या ध्वनींच्या परिवर्तनाच्या दृष्टीने, ' पर्ण ' हा शब्दच ' पान ' या शब्दाच्या मुळाशीं आहे, हें ज्ञान आपल्याला झालें आहे. प्राचीन काळापासून आजपर्यंत तो कसकसा बदलत आला, याचा पुरावा वेगवेगळ्या काळीं लिहिल्या गेलेल्या साहित्यांतून गोळा करून आपण त्याबद्दल खात्री करून घेतली आहे. या शब्दाच्या परिवर्तनाला लागणारे नियम इतर तशाच शब्दांनाहि लागू पडतात. ध्वनि आणि अर्थ यांच्या बाबतींत ' पर्ण ' या शब्दाकडून व्यक्त होणारी परंपरा ' पान ' या शब्दाकडूनहि चालवली जात आहे आणि या ' पान ' शब्दाने इतर कांही अर्थ व्यक्त होत असले, तरीहि ते कांही विशिष्ट बौद्धिक प्रवृत्तींना आणि नियमांना धरून होतात, असें दाखवून देतां येतें; एवढेच नव्हे तर अर्थाच्या दृष्टीने भाषेच्या रूढींत घडून येणारा हा फरक हा भाषाशास्त्राच्या एका स्वतंत्र शाखेचा विषय आहे.

अशा रीतीने भाषेमागील बौद्धिक प्रवृत्तींची जाणीव ध्वनींच्या इतिहासाच्या ज्ञानाइतकीच अपरिहार्य आहे. म्हणून भाषेच्या शास्त्रीय स्वरूपाचें यथार्थ आकलन होण्यासाठी भाषेचा,

म्हणजे ज्या परंपरागत ध्वनींनी समाज आपले व्यवहार चालवतो त्या ध्वनींचा इतिहास आणि ती भाषा ज्या समाजाकडून बोलली जाते त्या समाजाच्या जीवनाचें सूक्ष्म ज्ञान आपण मिळवलें पाहिजे. त्याचप्रमाणे एका विशिष्ट काळांतील भाषेचें स्वरूप निश्चित करावयाचें असेल, तर त्या भाषेचा त्या काळांतील व्यवहार किती व कोणत्या ध्वनींनी होत असे, तें दाखवून दिलें पाहिजे.

इतिहास, गणित, साहित्य इत्यादि शास्त्रें आज मान्यता पावलेलीं आहेत; ती मान्यता अजून भाषाशास्त्राला मिळालेली नाही. ध्वनींची माहिती मिळविण्यांत फायदा काय, हा प्रश्न सुशिक्षित लोकहि विचारतात; आणि भाषाशास्त्र, ध्वनिविचार यांसारखे विषय विद्यापीठांतून शिकविण्याची कांही आवश्यकता आहे, असें मोठमोठ्या शिक्षणतज्ज्ञांनाहि वाटत नाही. ही उदासीनता उद्वेगजनक आहे आणि ती लौकर दूर होऊन या देशांतील विद्यापीठांत भाषेच्या शास्त्रीय अभ्यासाला योग्य तें स्थान मिळेल असें वाटत नाही. शिवाय अनेक अनधिकारी लोकांनी या विषयांत हस्तक्षेप करून त्यासंबंधी इतके गैरसमज निर्माण केलेले आहेत कीं, त्या गैरसमजांचें निराकरण करणें हेंहि भाषाशास्त्राचें यथार्थ स्वरूप अभ्यासकांच्या नजरेला आणणाऱ्या शिक्षकांचेंच काम झालें आहे.

अधिक ज्ञान मिळविणें, न समजणाऱ्या प्रश्नांचा समाधानकारक खुलासा करणें आणि जिज्ञासा जागृत ठेवून बुद्धीचा जिवंतपणा कायम ठेवणें, हें खऱ्या शिक्षणाचें कार्य आहे. बाहेरील जगाच्या निकट सान्निध्यांत येण्याची संधि आपणाला आज मिळाली आहे. परकीय भाषांच्या अधिकाधिक अभ्यासाने आपणाला इतर समाजांची जितकी ओळख होईल तितकी ती इतर कशानेहि होणार नाही. परकीय भाषा शुद्धपणें बोलण्यासाठी त्या भाषेंतील ध्वनींचा नीट अभ्यास करून ते ध्वनी बिनचूक उच्चारण्याची कवायतहि आपण केली पाहिजे.

अर्थात्, भाषाशास्त्र शिकतांना तें अमुक दृष्टीने उपयोगी आहे म्हणून शिकता कामा नये. उपयुक्ततेच्या दृष्टीने चालविलेलें ज्ञानार्जन हें शास्त्रीय संशोधनाच्या तत्त्वाला घातक आहे; कारण या वृत्तीने संशोधन करणारी व्यक्ति तें तन्मयतेने आणि निरपेक्षपणें करूं शकणार नाही. पूर्वी उपलब्ध नसलेलें ज्ञान प्रकाशांत आणणें हेंच संशोधकाचें कार्य असलें पाहिजे. तें निरुप-योगी आहे किंवा घातुक आहे, याचा काथ्याकूट करण्याचें त्याला कारण नाही; कारण उपयुक्त-तेच्या दृष्टीने होणारें संशोधन सर्वांगीण होणें शक्य नाही आणि ज्ञानांत सर्वांगीण भर टाकणे हें तर ज्ञानवृद्धि करणारांचें काम आहे.

मराठी भाषेंतून शास्त्रीय विषयांवरील ग्रंथ लिहिणाऱ्या लोकांना एका महत्त्वाच्या प्रश्नाला तोंड द्यावें लागतें. हा प्रश्न परिभाषेचा होय. शास्त्रीय प्रगतींत मागासलेल्या समाजाच्या भाषेंत तें शास्त्र सुटसुटीतपणे व्यक्त करण्याला लागणाऱ्या शब्दांचा अभाव असणें, ही गोष्ट अत्यंत स्वाभाविक आहे. हा अभाव दूर केल्याशिवाय शास्त्रीय विषयांवरचें लेखन होणें शक्य नाही. तो दूर कसा करावा आणि स्वभाषेंतून जिज्ञासूंना वेगवेगळ्या शास्त्रांचें ज्ञान अगदी सोप्या रीतीने कसें करून द्यावें, याबद्दल विचार होणें जरूरीचें आहे.

वेगवेगळ्या शास्त्रांतील पारिभाषिक संज्ञा गोळा करून त्यांचें हिंदीकरण करण्याचा कार-खाना नागपूर येथे चालू आहे. पारिभाषिक संज्ञांचे भारतीय प्रतिशब्द त्या त्या विषयावरील ग्रंथ लिहिले जाण्यापूर्वीच तयार करून ठेवले म्हणजे शास्त्रज्ञांना नवे शब्द शोधून काढण्याचा त्रास पडणार नाही, या सद्धेतूने प्रेरित होऊन हें कार्य हातीं घेण्यांत आलेलें आहे.

अनुक्रमणिका

पण परिणामकारक शास्त्रीय लेखनाला ही पद्धत उपयोगाची नाही. खरें म्हणजे आपल्याला परिचित असलेल्या शब्दसंग्रहाच्या मदतीने शास्त्रीय प्रश्नांवर लेख लिहिले गेले पाहिजेत. विवेचनाच्या ओघांत सहज सुचलेला शब्द हा मुद्दाम बनविलेल्या पारिभाषिक शब्दांपेक्षा अधिक महत्त्वाचा होय. असे सहज सुचून रूढ झालेले शब्द भाषेची अर्थवाहकता वाढवतात आणि वाचकाला फारसे परिश्रम न होतां समजतात.

संस्कृत धातूंवरून अथवा शब्दांवरून पारिभाषिक कोश तयार करण्याची पद्धत अनिष्ट आहे. आधी शास्त्रीय विषयांचा नीट अभ्यास केलेली पिढी तयार झाली पाहिजे आणि केवळ भाषांतर करण्याची आकांक्षा बाळगणारा नव्हे तर शास्त्रांचा नीट अभ्यास करून त्यांत अधिक भर घालण्याच्या हेतूने संशोधनामार्गे लागलेला विद्वद्वर्ग तयार झाला पाहिजे. अशा व्यक्तींकडून लिहिले जाणारे लेख अथवा ग्रंथ हेच विवेचनाच्या आणि परिभाषेच्या दृष्टीने आदर्श मानले पाहिजेत. शास्त्रीय साहित्यनिर्मितीच्या प्रारंभींच्या प्रयत्नांत परिभाषेविषयीं एकवाक्यता नसली तरी हरकत नाही, पण या पहिल्या प्रयत्नांतूच हवी असलेली सामग्री आपणाला मिळेल. अशा रीतीने रूढ झालेले शब्द सर्वांना परिचित होतील. त्यांचें मूळ काय आहे अथवा त्यांचा खरा अर्थ काय आहे, हे वाद निरर्थक होत. मुद्दाम नवे शब्द निर्माण करून रूढ असलेले शब्द शास्त्रीय नाहींत या सबबीवर काढून टाकणें अत्यंत कोत्या बुद्धीचें लक्षण आहे.

इतकें असूनहि ज्या ठिकाणीं एखादा नवा शब्द आणणें अपरिहार्य ठरेल त्या ठिकाणीं तो बोलभाषेंतील साधनांचा उपयोग करून बनवावा. सामान्य वाचकाला परिचित अशा सुट-सुटीत संस्कृत शब्दाचा प्रयोग केला तरीहि चालेल, पण ज्याचा अर्थ समजण्यासाठी त्याला संस्कृत शब्दकोशाकडे किंवा पारिभाषिक शब्दकोशाकडे धांव घ्यावी लागेल असा शब्द टाळणेंच योग्य ठरेल. भाषेंतून शब्द कोशांत आला पाहिजे, कोशांतून भाषेंत नव्हे.

कोणत्याहि ग्रंथांत उदाहरणें आणि तात्त्विक विवेचन यांच्या मदतीने नव्याने उपयोगांत आणलेला शब्द स्पष्टपणें समजेल अशी काळजी घेण्यांत आली पाहिजे आणि हा नवा शब्द फक्त विशिष्ट अर्थानेच नवा असून एरव्हीं तो दुसऱ्या अर्थाने किंवा अर्थांनी भाषेंत रूढ आहे आणि साधारण सुसंस्कृत वाचकांच्या परिचयाचा आहे, याकडेहि लक्ष देण्यांत आलें पाहिजे.

शास्त्रीय ग्रंथाचें वाचन करतांना तें प्रारंभापासून सुरवात करून क्रमाक्रमाने शेवटा-पर्यंत जात केलें पाहिजे. आपल्याला कुतूहल असणाऱ्या विषयाची माहिती देणारें पान उघडून आणि तेवढाच भाग वाचून जिज्ञासूचें नेहमीं समाधान होईल असें नाही, कारण पुढील प्रकरणांत आलेल्या विवेचनाचे धागे मागील प्रकरणांत असतात, म्हणून असें वाचन अनेक वेळां गैरसमज आणि गोंधळ निर्माण करतें.

पूर्वरचित ग्रंथांच्या अभ्यासाशिवाय आणि त्यांनी ज्ञानांत टाकलेली भर लक्षांत घेतल्याशिवाय कोणत्याहि शास्त्राच्या उत्क्रांतीची, प्रगतीची, व त्या शास्त्रापुढे असणाऱ्या न सुटलेल्या प्रश्नांची व त्यांतल्या अज्ञात गोष्टींची योग्य कल्पना येणें शक्य नाही. ही कल्पना ज्याला नीटपणें आली असेल आणि अधिक ज्ञानार्जनासाठी व संशोधनासाठी हें शास्त्र कोणत्या पद्धतीचा उपयोग करतें हें ज्याला पूर्णपणें समजलें असेल, तोच तें शास्त्र आहे याहून अधिक पुढे नेऊं शकेल. केवळ जुन्या भाषा शिकून जुनें साहित्य वाचून 'आपल्या' तत्त्वांनी भाषेचा पुरावा हाताळणाऱ्या पंडितांना आधुनिक भाषाशास्त्रांत स्थान नाही. केवळ वररुचि, हेमचंद्र

किंवा लक्ष्मीधर यांचीं व्याकरणें वाचून भाषाशास्त्र किंवा आर्यभाषांची उत्क्रांति यांचें यथार्थ ज्ञान होणार नाही. ग्रंथांचा अभ्यास भाषेच्या अभ्यासाचीं साधनें म्हणून अवश्य केला पाहिजे, पण त्यांतलें ग्राह्य किती व अग्राह्य किती हें समजण्यासाठी शास्त्रीय बुद्धीचा विकास करणें अपरिहार्य आहे.

यासाठी शास्त्रीय विषयावरील जितके अधिक ग्रंथ वाचतां येतील तेवढे वाचून आपलें ज्ञान शास्त्रीय प्रगतीच्या वेगाने वाढविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. केवळ इंग्रजी ग्रंथ वाचून भाषाशास्त्राचें योग्य ज्ञान किंवा निरनिराळ्या भाषा, बोली, भाषासमूह इत्यादींबद्दल होणाऱ्या अभ्यासाची पूर्ण माहिती होणें अशक्य आहे. पण इतर भाषांतून होणाऱ्या मौल्यवान् ग्रंथांचें अज्ञान आपल्या देशांत भरपूर असूनहि तें दूर करण्यासाठी एखादी योजना करावी असा विचार कोणाऱ्याहि स्वप्नांतसुद्धा येत नाही ही खरोखर कौतुकाची गोष्ट आहे !

◆ ◆ ◆

नारायण गोविंद कालेलकर

---

# नवीन सभासद

### तहहयात

१. श्रीमंत सदाशिवराव रघुनाथराव पंत-सचिव, भोर (पुणें).
२. सौ. इंदिराबाई पेंडसे, सांगली.

### साधारण

१. श्री. गो. भा. पूरकर, पुणें २.
२. श्री. डी. जी. खेर, मुंबई.
३. श्री. वि. ग. जोशी, पंढरपूर.
४. श्री. कृ. ना. नाडगीर, कोल्हापूर.
५. सौ. प्रमोदिनी जुवेकर, द्वारका.
६. श्री. आर्. जी. खांबेटे, कलकत्ता.
७. श्री. स. किन्हुने, अंबेजोगाई (हैद्राबाद द.)
८. श्री. गो. भ. सराफ, अंबेजोगाई (हैद्राबाद द.)
९. श्री. श. मा. गर्गे, पुणें २
१०. प्रा. राम शिंदे, सातारा.
११. सौ. कमलाबाई कुमठेकर, सोलापूर.
१२. सौ. शांता रघुनाथ गोवईकर, सोलापूर.
१३. सौ. तारा कुलकर्णी, सोलापूर.
१४. श्री. स. सी. भावे, सोलापूर.
१५. श्री. श्री. वि. यावलकर, सोलापूर.
१६. श्री. कृ. व्यं. पेशकार, अमरावती (म. प्र.)
१७. प्रा. सु. म. डोळके, नागपूर (म. प्र.)
१८. प्रा. भ. प्र. मोहरीर, अचलपूर (म. प्र.)
१९. सौ. वनमाला भवाळकर, सागर (म.प्र.)
२०. डॉ. दे. र. भवाळकर, सागर (म. प्र.)
२१. श्री. ग. तु. मोकल, पुणें २.
२२. श्री. ए. दा. कांबळे, सांगली.
२३. श्री. य. ज. आठल्ये, सांगली.
२४. सौ. विमल काळे, सांगली.
२५. श्री. गो. ह. दंडवते, तडवळे, (सोलापूर)
२६. श्री. नी. म. केळकर, मुंबई.

---

# कांही नवे पद्यप्रकार

**थोडें प्रास्ताविक :**

संगीतप्रधान नाटकें ज्या काळापासून लिहिलीं जाऊं लागलीं तेंव्हापासूनच गेय काव्य-रचनेचा प्रचार झाला आणि विस्तृत असे निरनिराळ्या प्रकारचे पद्यप्रकार रूढ झाले. अर्थातच लोकप्रिय चालीवर कित्येक रचना लिहिल्या गेल्यामुळे आणि नवीनतेची हाव निर्माण झाल्यामुळे कितीतरी नवीन जातिप्रकार अस्तित्वांत आले. या सर्व जाति आणि छंद—प्रकारांचें विवेचन कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या ' छन्दोरचना ' या ग्रंथांत शास्त्रशुद्ध रीतीने केलेलेंच आहे. परंतु त्यांच्या पश्चातहि नवीन नवीन पद्यप्रकारांची निर्मिती चालूच राहिली. पण त्यांचें स्वतंत्रपणे वर्गीकरण करण्याची आवश्यकता अजून तरी कोणास न वाटल्यामुळे, तशी रचना अजून विखुरलेलीच आहे. अशाच कांही नवीन पद्यप्रकारांचें वर्गीकरण ( ज्यांचा उहापोह छन्दोरचनेंत नाही आणि तें शक्यहि नव्हतें ) प्रस्तुत लेखांत करण्याचा मानस आहे.

**वर्गीकरणाची आश्यकता :**

यापूर्वीं असा एक प्रश्न उद्‌भवतो की छन्दोरचनेसारखा विस्तृत ग्रंथ उपलब्ध असता नि त्यांत निरनिराळ्या पद्यप्रकारांचें विवेचन असतां आणखी नवे प्रकार कशाला ? शिवाय आता मुक्तछन्द हा एक विशिष्ट छन्दप्रकार जन्मास आला आहे ! मग त्या नव्या पण जुन्या झालेल्य पद्यप्रकारांचें प्रयोजन काय ? परंतु याचें उत्तर देण्यापूर्वीं असा एक प्रश्न विचारणे युक्त होईल की एकंदरीत छन्दोरचनेची तरी आवश्यकता काय ? नि हीं निरनिराळीं शास्त्रें कशाला ? शिवाय कालचा दोष तो आजचा गुण म्हणजे गुणदोषांकडे पाहण्याची प्रवृत्तीच जर सापेक्षता-प्रधान झालेली आहे तर या सर्व खटाटोपाचा अर्थ तरी काय ? अर्थात्, शास्त्रीय दृष्टी येऊन रचना विशेष रेखीव नि आकर्षक व्हावी हा हेतु ! शास्त्र हें अपार नि अगाध आहे. वेळोवेळीं त्यांत भर ही पडतच रहाणार आणि ती पडत राहिलीहि पाहिजे.

या दृष्टीने कांही विखुरलेल्या नवीन पद्यप्रकारांचें वर्गीकरण करणें अयोग्य होणार नाही !

**पार्श्वभूमि :**

छन्द या व्यापक शब्दाचें तीन प्रकारांत वर्गीकरण केलेलें आहे.

१ वृत्त : यांत लगक्रम अक्षरें नि मात्रा तिन्हींचें बन्धन असतें.

२ जाति : यांत फक्त मात्रांचें बन्धन असतें.

३ छंद : यांत फक्त अक्षरांचें बन्धन असतें.

वृत्तें ही अनावर्तनी आणि आवर्तनी दोन्हीं प्रकारचीं आहेत. जाति या सर्व आवर्तनी आहेत. ही आवर्तनें पद्म ( अष्टमात्रक ), अग्नि ( सप्तमात्रक ), भृंग ( षण्मात्रक ), व हर ( पंचमात्रक ) अशीं असूं शकतात.

जातिप्रमाणेच अक्षरछन्दहि आवर्तनी आहे. आणि त्यांत प्रत्येक अक्षर गुरूच समजलें गेलें असल्याने ( मग तें ह्रस्व असलें तरीहि ) तें छान्दस असतें. म्हणजेच प्रत्येक अक्षराच्या

मात्रा दोन असतात. अर्थातच अक्षरछन्दाच्या एकंदर मात्रा समच असणार. त्यामुळे छन्द पद्मावर्तनी नि भृंगावर्तनी या दोन प्रकारचेच होऊं शकतात. ते अग्न्यावर्तनी वा हरावर्तनी या विषम मात्रांचे होऊं शकत नाहीत. ( छन्दोरचना पान ५१३ )

सम, अर्धसम वा विषम हेहि पोटभेद वृत्त, जाति वा छन्दांत असूं शकतात.

### वर्गीकरणापूर्वी :

पुढे केलेलें वर्गीकरण बहुतेक छन्दोरचनेप्रमाणेच आहे. परंतु कांही बाबतींत तेव्हढें वर्गीकरण अपुरें पडतें. उदाहरणार्थ, जाति आणि वृत्त यांच्या मिश्रणाने झालेल्या पद्यांस कोणत्या वर्गात ठेवावयाचें ? अर्थात्, कोठल्यातरी वर्गात त्याला बसविलें तर पाहिजे, आणि त्यांत त्याचें वैशिष्ट्यहि व्यक्त झालें पाहिजे ! म्हणून अशा प्रकारच्या पद्यांना—ज्यांत वृत्त आणि जाति यांचें मिश्रण असेल त्यांस—" जाति–वृत्तें " अशा संयुक्त नांवाच्या वर्गात बसविणें सोयीचें होईल. जाति–वृत्तें हा वर्ग पुढे दिलेल्या वर्गीकरणांत निराळा केलेला आहे.

एकाच कडव्यांत मिश्र आवर्तनें असलीं की त्यांसहि कोठल्यातरी वर्गात बसविणें इष्ट होईल. गाऊन दाखवितांना ताल वा ठेका बंद ठेवावा असें छन्दोरचनाकारांनी सुचविलें आहेच. वा तेवढ्यापुरता ठेकाच बदलून घ्यावा. गवई अशा प्रकारच्या पद्यांना गोड चाल लावतोच. आणि अशीं कित्येक भावगीतें लोकप्रिय झालीं आहेत.

अशा प्रकारचीं पद्यें निर्माण करण्याचे प्रयोग चालूं होते. आणि आहेतहि. अशीं पद्यें म्हणण्यासाठी गायक त्यांस कशीहि चाल लावो पण छन्दशास्त्रदृष्ट्या त्यांचें निराळें वर्गीकरण कां करू नये ? म्हणून अशाच म्हणजे ' मिश्रावर्तनी वृत्तें, जाति आणि छंद ' या गटाचें विवेचन पुढील परिच्छेदांत केलेलें आहे.

### वर्गीकरणासंबंधी :

उपरिनिर्दिष्ट दृष्टिकोनाप्रमाणें एकंदर पद्यरचनेचे सर्वसामान्यपणें दोन भाग केलेले आहेत. पहिला भाग 'अनावर्तनी' व दुसरा ' आवर्तनी '. पहिल्या भागांत अनावर्तनी वृत्तांचा समावेश केला आहे. दुसऱ्या भागाचे तीन गट कल्पिलेले आहेत. पहिल्या गटास ' समावर्तनी वृत्तें, जाति व छन्द ' हें नांव दिलें आहे. म्हणजे एका कडव्यांत एकच एक सारखें आवर्तन असून तशाच कडव्याच्या समुच्चयाने सिद्ध होणाऱ्या पद्यांचा समावेश या गटांत केलेला आहे. दुसऱ्या गटास ' मिश्रावर्तनी वृत्तें, जाति व छन्द ' हें नांव दिलें आहे. म्हणजे एकाच कडव्यांत ( एका चरणांत नव्हे ) भिन्न आवर्तनें असून आणखी तशाच कडव्यांच्या समुच्चयाने सिद्ध होणाऱ्या पद्यांचा समावेश या दुसऱ्या गटांत केलेला आहे. तिसऱ्या गटास ' मुक्त वृत्तें, जाति आणि छन्द ' हें नांव दिलें आहे. यानंतर पहिल्या गटाचे दोन विभाग कल्पून पहिल्या (अ) विभागांत सर्व वृत्तें, जाति आणि छन्द यांचा आणि दुसऱ्या (ब) विभागांत ' जाति-वृत्तें ' यांचा समावेश केलेला आहे. यानंतर (अ) विभागाचे सम, अर्धसम, आणि विषम प्रकार १ आणि २ असे पोटविभाग छन्दोरचनेप्रमाणेंच पाडलेले आहेत. संपूर्ण छन्दोरचनेंत फक्त पहिल्या गटांतील या (अ) विभागाचाच आणि अनावर्तनी वृत्तांचाच विचार केलेला आहे. (ब) विभागाचे अर्धसम आणि विषम प्रकार १ व २ असे पोट विभाग पाडलेले आहेत. यांत सम हा पोटविभाग संभवनीय नाही. कारण चरणाचा अर्धभाग जातींत आणि अर्धभाग वृत्तांत असा कांही चमत्कारिक चरण निर्माण करण्याचें धाडस कोणी कवि करील असें वाटत नाही. परंतु असें कांही झालें तर मात्र कदाचित जाति-वृत्तें सम होऊं शकतील.

अनुक्रमणिका

वरीलप्रमाणेंच 'मिश्रावर्तनी वृत्तें, जाति आणि छन्द' या गटाचे अर्धसम आणि विषम प्रकार १ व २ असे पोटविभाग पाडलेले आहेत. एकाच चरणांत भिन्न आवर्तनें आल्यामुळे लयभंग होईल आणि म्हणूनच या प्रकारचीं वृत्तें, जाति आणि छन्द सम असूं शकणार नाहीत. या दृष्टिकोणाप्रमाणें जाति मनमोहन, घोररजनी आणि सन्देश यांनाहि या गटांतील पोटविभाग विषम जाति प्रकार एक यांतच टाकलें पाहिजे.

'मुक्त वृत्तें, जाति आणि छन्द' या तिसऱ्या गटाचें विवेचन पुढे अनुक्रमाने केलेलें आहे.

वर दिलेल्या वर्गीकरणाचें स्पष्टीकरण पान १८ वर दिलेल्या तालिकेवरून होईल.

तालिकेंत * ही फुली असलेल्या पोटविभागांत येणाऱ्या जाति व छन्द यांचीं उदाहरणें वगैरे सांपडलीं नाहीत म्हणून त्यांबद्दल पुढे कांही लिहिलेलें नाही. पण म्हणून तीं असूंच शकणार नाहीत असें अर्थातच नाहीं.

पुढील विवेचन 'समावर्तनी जाति' येथपासून केलेलें आहे. समावर्तनी वृत्तांबद्दल छन्दोरचनेंत भरपूर विवेचन आहेच. (पहा छन्दोरचना पान १२९ ते २०६ व पुढे २३४ ते ३३३)

पद्यविहार

गट पहिला—समावर्तनी जाति

अ विभाग—जाति

समजाति (वर्ग पहिला)

हरावर्तनी समजाति

१ दिनान्त [ ⏑ – –, ⏑ – –, ⏑ – –, ⏑ – – ]

दिनान्तीं श्रमान्तीं किती गोड शान्ती
सकलहि घरिं जाती श्रमोनी दिनान्तीं

(तांबे—कविता क्रमांक १७९)

भुजंगप्रयात वृत्तांत दीर्घ अक्षराच्या जागीं दोन लघु अक्षरें घालण्याचें स्वातंत्र्य घेतल्याने ही जाति सिद्ध होते. मात्र लघु अक्षरांच्या जागीं दीर्घ अक्षर चालणार नाही. वर दिलेल्या कवितेच्या या दोन ओळीच केवळ दिनान्त जातींत आहे. सबंध कवितेची जाति हरिणनयना आहे. हिचें विवेचन पुढे मिश्रावर्तनी जाति या गटांत केलें आहे. [क्रमांक ४३ पहा]

## अर्धसम जाति : वर्ग दुसरा

**पद्मावर्तनी अर्धसम जाति :**

रेशिमकान्ती [ । प । प । – + ]...वंशमणी
[ । प । प । प । – + ]...लवंगलता

निवली खळबळ निवान्त झुलती लाटा
कधीच गेल्या रेतीवरल्या पुसून पाउल वाटा।

[पुढील मजकूर पान १९ वर पहा]




× या वर्गीकरणाशी डॉ. ना. ग. जोशीकृत “ मराठी छंदोरचनें ’तील (पृ. ३१०) वर्गीकरण पडताळून पाहण्यासारखें आहे—विशेषत: मुक्तछंदादि प्रकारांचें वर्गीकरण. संपादक

पुळणीवरती तरल ओलसर शान्ती
झिळमिळते वर तृप्त उन्हाची पिवळी रेशिमकान्ती।
( मंगेश पाडगांवकर, जिप्सी. पान ११६ )

ही कविता ' जिप्सी ' पुस्तकांत
" निवली खळबळ
निवान्त झुलती लाटा
कधीच गेल्या
रेतीवरल्या
पुसून पाउलवाटा ! "

अशा पद्धतीने लिहिलेली असली तरी पद्यघटना ठरवितांना चरणान्ती असलेला विराम लक्षांत घेऊनच वर चरण निर्णय केलेला आहे. कवीने चरण स्वेच्छेप्रमाणे वाटेल तिथे तोडून लिहिलेले असले तरी वस्तुत; ते तसे नाहीत. आणि या दृष्टीने वर दिलेली जाति अर्धसम ठरते.

भृंगावर्तनी अर्धसमजाति

३ इन्द्रचाप [ । भृ । भृ । भृ ।– ⏑ + ] मदनरंग
[ । भृ । भृ । भृ । + ] धवलचन्द्रिका

( १ ) उचम्बळति अननुभूत लहरि लहरि मन्मनीं
सखे नजर बन्द धुन्द होइ उन्मनीं. धृ
हांक गोड एक तुझी लावि वेड वादळी
जवळि तुझ्या घेति ओढ पाय मोहुनी।
वेळ नको येई सखे हृदय तप्त टेकुं दे
अधरिं ओतुं दे तुझ्याहि आग या क्षणीं।
( स्वकृत—अप्रकाशित )

( २ ) पहा हो कसा हा कारागीर
थरारुनी तनू झरे नयनीं नीर ॥ धृ० ॥
कतरण ही पानिं पानिं रम्य झालरीपरी
तरी करान्तरीं कुठे नाहि कातरी
( फु ) लांफुलांमध्यें कशा छटा सुरम्य रंगल्या
इन्द्रचापिं रंग हे करिं न कुंचल्या !
( ताम्बे—कविता क्रमांक १५० )

शेवटल्या ओळींतील 'रिं' आवर्तनाच्या दृष्टीने दीर्घ हवी.

वर दिलेल्या तांब्यांच्या या कवितेबद्दल कै. माधवराव पटवर्धन म्हणतात—" 'पहा हो कसा हा कारागीर' ही कविता जाति वा वृत्त दृष्टया सदोष आहे. कारण ती गवयाच्या चीजेप्रमाणें म्हणायला तिला संथा द्यावी लागते. " ( पहा तांबे समग्र कविता, संपादक : माधवराव पटवर्धन, द्वितीयावृत्ती–पान २९७ ) पण सूक्ष्म दृष्टीने पाहता ही कविता षण्मात्रक म्हणजे भृंगावर्तनी आहे असें कळून येतें आणि नुसती भृंगावर्तनीच नव्हे तर अर्धसम असून जाति मदनरंग आणि धवलचंद्रिका यांच्या संयोगाने ती झालेली आहे. कवितेंत कुठे कुठे शैथिल्य आहे. पण ज्या कारणास्तव छंदोरचनाकार ही कविता सदोष मानतात तें अर्थातच मला मान्य नाही.

## विषम जाति ( वर्ग तिसरा ) प्रकार पहिला

**पद्मावर्तनी विषम जाति**

४ कुजवुज [ । प । प । प । ‿ + ] समुदितमदना दोन वा अनेक
[ । क । प ‿ + ] पर्वती एक चरण

कुजवुजले ते ' जरा लाडके ! नजर करुनि वर पहा ! '
मीच उसलुनी म्हटलें रोषें ' जा कसला खेळ हा ! '
खिळले तिथेच पण ते पहा !
समोर झाले उभे, दोन्हि कर माझे करिं घेउनी,
त्रासुन मग तोंडांतुन आलें ' सोडा ! जा, येथुनी ! '
परी नच ढळले पद तेथुनी ! *

( ग. न. पंडित—फुलबाग, कविता ३७ )

५ अनुरक्त [ । प । प । प । + ] पतितपावन अनेक
[ । प । प । प । – + ] लवंगलता एक

कुणी वावळी होती भटकत इकडे तिकडे मस्त
पाहुनि तिजला क्षणांत झालों तिजवर मी अनुरक्त ! ॥ धृ० ॥
विचारलें मी, " क्षमस्व देवी, कुठली ही किमया ? "
हळुंच म्हणाली हंसुनी ती मम कानीं लागूनियां
" कटोरींत मम दिव्य रसायन म्हणति जया कविरक्त ! "

( स्वकृत—अप्रकाशित )

६ मोहफूल [ । प । प । प । ] अनलज्वाला दोन वा अधिक
[ । प । प । प । प ] एक चरण

इतुकें आलों जवळ जवळ कीं जवळपणाचें झाले बंधन ! ॥ धृ० ॥
छेडणार जर होतो आपण गीत नवे तर
हवेच होते वीणेच्या तारांतुन अन्तर
धुन्दपणीं त्या...अन्धपणीं त्या भान राहिलें नाही हें पण
मोह फुलांपरि तेव्हांचे ते क्षण दरवळले
गान्धित उन्मद त्या अन्धारीं कांही न कळलें
नव्हती जाणिव होइल म्हणुनी शृंखलाच हें मधु आलिंगन

( मंगेश पाडगांवकर—जिप्सी. पान ७६ )

७ दर्शन [ । प । प । प ] अनलज्वाला अनेक
[ – । प । प । प ] एक चरण

मी कधीच नाही म्हटलें की तूं दे मज दर्शन ।
होत्या लाटा उधळित अपुली फेनिल कविता
फुलांफुलांतुन अखण्ड उमलत होती नवता

---

* हें आणि यापुढे आलेलीं ग. न. पंडितकृत उदाहरणें त्यांच्याच ' फुलबाग ' या अप्रकाशित काव्यसंग्रहांतून घेतलेलीं आहेत.

होते वारे वाहत, तारे होते चमकत
वाभाळिवरही गुच्छ फुलांचे होते लगडत
रे, कसे वेगळे म्हणूं सांग तुज यांच्यापासुन।
मी, कधीच नाही म्हटलें की तूं दे मज दर्शन।
( मंगेश पाडगांवकर—जिप्सी. पृ. ६६ )

पण ही कविता सदोष आहे. कारण ''अनलज्वाला अनेक'' हा भाग संपल्यानंतर पुढल्या ओळींत दोन मात्रांचा आद्यतालकपूर्व गण आलेला आहे तो नसणेंच आवश्यक आहे, कारण, तो म्हणावयाला पूर्वीच्या चरणांच्या अंत्य आवर्तनांत जी कूस पाहिजे ती नाही. तरीहि अनुकरण होऊं लागलें की ' शास्त्राद्रूढिर्बलीयसी ' होतेच.

८ रक्तमुखी : [ –।प । प । – + ] भूपति अनेक
[ । प । प । प । – – + ] हरिभगिनी एक
चल, घरीं चलूं ! चल घरीं चलूं !
अंधारुन आले मेघ अम्बरीं भरती
टपटपा टपोरे मुक्तथेम्ब कोसळती
कां विरळ जुना हा वृक्ष आसरा होय
या शेकोटीची ऊब करी सुखसोय !
रक्तमुखी ठसक्याने म्हणशी ' नकली बोल नको बोलूं ! '
[ भालचंद्र लोवलेकर यांची कविता. पान ३४ ]

या कवितेचीं पहिलीं दोन कडवींच या जातींत आहेत. बाकीचीं भूपति जातींत आहेत. ध्रुवपद ' कर्णफूल ' जातीचें आहे.

९ पैंजण : [ – । प । प । – + ] भूपति एक चरण
[ – । प । – + ] उद्धव दोन चरण
भेटीस रात्रिंची, निघतां एकटि वाई !
पांखरें न गातीं तेव्हा—
वारा मुळि वाहत नाही !
झालेलि सामसुम घरोघरीं रस्त्याने
पैंजणचि वाजती भारी—
लाजते पदोपदिं त्याने...!
( ग. न. पंडित—फुलवाग कविता ९ वी )

१०. सुवर्णवारुणी [ । प । प ] पादाकुलक अनेक
[ । प ।– + ] } गगनचपला एक
[ । प । प । प ।– + ] } संयुक्त चरण

माध्वीपानोन्मत्ता

टाकिलीस कां, दारें फोडुन, हाणुनि त्यावर लत्ता ?
खदखदते ही सुवर्णवारुणि
हसेन खदखद गटगट पिउनी

फाडुनि लज्जा वसनें फेंकुनि
व्रीदच्च माझें आता
कवडिमोल होणें या जगतीं, करुनि कोरडा गुत्ता !
( ग. न. पंडित—फुलबाग कविता ४२ )

१० ( अ ) निशिगन्धा : [ । प । प ] पादाकुलक अनेक
[ । प । प । प । ⌣ + ]
[ – । प । – – + ] } एक संयुक्त चरण

सखि भान आज मम हारपलें
म्हणुं नकोस चाळे हे वेडे ! धृ.
निशिगंधाला हृदिं लावुनियां
रातराणिला कुरवाळुनियां
तरंग मनिंचे मनिं गुंफुनियां
फेंकियलें वरि चन्देसाठीं—कुठल्या आशेकडे ?
– कां श्वासवेग माझाहि चढे ?
( स्वकृत—अप्रकाशित )

११ स्वरभाव [ – । प । – + ] उद्भव दोन वा अधिक
[ – । – + ऽ – ⌣ । + ] एक
चल वाजव सखि, सारंगी,—०घे हरुनी देहभान्
त्या कम्पित होतां तांती
स्वरभाव मिळूनी जाती,
मुरकीची काय मजा ती !
कर मज तूं भाग्यवान्
( माधव जूलियन् )

वर दिलेलें उदाहरण छन्दोरचनेंत पान ४७७ वर पुष्पिता जातीचें म्हणून दिलें आहे, तें मात्र बरोबर वाटत नाही. अन्तर्घटनादृष्ट्या ती पुष्पिता जातीपेक्षा भिन्न जातीची ठरते. जाति शामाराणी ( पद्यप्रकाश पान ९२ ) आणि जाति प्रणयप्रभा ( पद्यप्रकाश पान ९४ ) यांतील भेदाप्रमाणेच जाति पुष्पिता आणि वर दिलेली जाति स्वरभाव यांत भेद आहे, हें कळून येईल.

१२ वन्यपुष्प : [ । प । – – + ऽ ऽ । प । + ⌣ ] दोहा दोन चरण
[ ⌣ – ⌣ । ⌣ – ⌣ । – – – + । ऽऽ ⌣ – ⌣ । ⌣ – ⌣ । – ऽऽ + ऽऽ । ऽऽ ]
मोहिनी एक चरण

वन्य ही फुलांची माला गळा व्याल का हो
भक्तिपंथि पाउल पहिलें चालवाल का हो
धाडस अमुचें हें खरें प्रेरक परि त्या कोण
दिला भाव तो निभवुनी घेण्या समर्थ कोण
आपुल्याविणे ना कोणी, गळा प्याल का हो ?
( ग. न. पंडित—अप्रकाशित )

अनुक्रमणिका

१३. वनवासी : [ । प । – – + ऽ ऽ । प । + ‿ ] दोहा दोन चरण
[ । प । प ] पादाकुलक एक, दोन वा अनेक.

या पाप्याच्या पायासाठी
अपराध्याच्या कार्यासाठी
जोगिण होइन, झोळी घेइन,
वनवासी वनिं रानीं राहिन ! ध्रु.
तुम्ही शहाणे थोर यां म्हणती राजद्रोहि
या साठिच मी वावळी पडलें यांच्या मोहिं !
या कलिज्याच्या देवासाठी
या जीवाच्या जीवासाठी
जोगिण होइन, झोळी घेइन
वनवासी वनिं रानीं राहिन !

( ताम्बे )

प्रा. रा. श्री. जोग संपादित ' ताम्बे समग्र कविता ' आवृत्ति पांचवी या पुस्तकांतल्या परिशिष्टांत ही कविता ( देशद्रोह की राजद्रोह ? ) दिलेली आहे.

विळतकर-पेण्ढारकर संपादित " पाउलें " काव्यसंग्रहांतील रा. मो. करकरे यांची " वेडी होइन " ही कविता आणि अनिल यांचीं " आरास " ( पेर्तेंव्हा पान २८ ) ही कविता या दोन्हीहि वनवासी जातींत आहेत.

## भृंगावर्तनी विषमजाति

१४. विश्वरूप : [ । भृ ] दोन
[ । भृ । भृ । भृ । – + ] परिलीना दोन व अधिक

वान्धितसा मन्दिर नव की हे प्रभुसाठी ?
भक्तिनेच काय अशा पुण्य पडे गांठी ? ध्रु.
मूढवृत्ति
हाय किती
खेड्यांतुन फिरकवुनी हीच जरा दृष्टी
झाले किति गरिब पहा हीन दीन कष्टी !
विश्वभूप
विश्वरूप
अखिल विश्व कोण्डाया वान्धणार भिन्ती ?
हें न तरी, देऊळ हें काय तयासाठी ?

( गिरीश—चन्द्रलेखा कविता ३१ )

' चन्द्रलेखा ' काव्यसंग्रहांत या कवितेला जाति इन्दुमुखी हें नांव दिलेलें आहे पण तें बरोबर वाटत नाही. कारण इन्दुमुखी जाति नसून 'वृत्त' आहे. नि त्याचा लगक्रम [ – ‿ ‿ – ।– ‿ ‿ – । – ‿ ‿ – । – ‿ ‿ – ] असा आहे. म्हणजे षण्मात्रक चार आवर्तनें आहेत. ( पहा छन्दोरचना पान १८६ व ३०९ )

अनुक्रमणिका

हरावर्तनी विषमजाति

१५ निश्वसन : [। – ⏑ – । – ⏑ –) सुरमन्दिर दोन वा अधिक
[। – ⏑ – । – ⏑ – । – ⏑ – । +) देव एक चरण

पातली ही अतां त्यागवेला
रात्र मध्यावरी
भेरि वाजे दुरी
तो उद्याचा यती सज्ज झाला !
प्रभु वंदे विश्वसुनि
त्रास येउन मनीं
सोडुनी मजसि मम शोध कसला !

(ग. न. पंडित—फुलबाग, कविता ७५)

विषम जाति : प्रकार दुसरा ( वर्ग चौथा )

पद्मावर्तती विषमजाति

१६ क्षिप्रा [। प । ं । प । ⏑ + ]
[ कं । प । + ]
[। प । प । प । ⏑ + ] } जगन्मंगला अनेक मिश्र चरण

[। प । प । प । + ] पतितपावन अेक चरण

राजन्वति गे विक्रमनगरी । करुं तव जयजयकार !
शोभने करुं तव जयजयकार !
महाराष्ट्र-भू मालव-भूचा तूं सुभगालंकार ! ध्रु.
पराक्रमाने सुपुत्र कन्या पावन करिती तुला
चमकुनी, पावन करिती तुला !
माय जाहली तृप्त पाहुनी तुझिया विक्रमकुलां !
बिक्रमराजे शककाली तुज वैभव देती नवे
निर्मुनी वैभव देती नवे
शालिवान–शिवछत्रपती त्या शोभलेत गौरवें !
राणोजी, जनकोजी भूषण खड्गवीर गे तुझे
गाजले खड्गवीर गे तुझे
रेवा, क्षिप्रा, चर्मण्वतिचे तेज न कधिही बुजे
दमयंती रुक्मिणिपरी –
आदर्श तुझ्या कन्यका,
लक्ष्मी नि अहिल्यासती —
करिती न तुला धन्य का ?
विक्रमांत या तेजस्वी तव रक्ताचा संचार
शोभने करुं तव जयजयकार !

महाराष्ट्र-भू मालवभूचा तूं शुभगालंकार
( गिरीश—चन्द्रलेखा. कविता ८ वी)

या कवितेच्या जातीचें नामकरण गिरीश यांनी 'सूर्यकान्त' ( म्हणजे समुदितमदना ) असें केलें आहे, तें मात्र बरोबर वाटत नाही. समुदितमदना ही समजाति आहे; उलट वर दिलेल्या कवितेचें मात्रिक पृथक्करण तिचें लक्षण ठरवितांना केलें आहेच आणि म्हणूनच ह्या कवितेची जाति समुदितमदना म्हणजेच सूर्यकान्त होऊं शकत नाहीं. ही विषमजाति ठरते ध्रुवपद मात्र 'सहस्रमुखी' जातीचें आहे. सहस्रमुखी जातीहि विषमच आहे. कडव्यांत [ =। प ~ + ] या भरतखंड मात्रावलीचा अंतरा आहे.

१७ हास्यद्युति : [ । प । +, क । प । + ] चन्द्रकला अेक चरण
[ । प । प । प । + ] पतितपावन तीन वा अधिक
[ क । प । + ] भुवनसुन्दर अेक चरण

येअिल मन उमजून सहजीं येअिल मन उमजून,
हणुनि टाकिसी, नित्य नवे हे, डाव किती योजून
अश्रु लपावे म्हणून दिपविसी हास्यद्युति उधळून !
ठाऊक ठाउक तुझी चातुरी वदसि न शब्द चुकून
मनीं जो राहि तुला टोंचून !
( ग. न. पंडित—फुलबाग ३५ वी )

या कवितेची पहिली ओळ ध्रुवपद नाही हें ध्यानांत ठेवावें. अशाच प्रकारच्या पांच पांच ओळींचीं पुढील कडवीं आहेत.

१९. अनन्तयौवन : [ । प । प ] पादाकुलक अेक
[ प । ] पद्म अनेक
[ । प । ~ + ] शुद्धसती अेक

सखि येगे ! सखि येगे !
वेगें स्वप्नशुभांगे ! ध्रु०
दर्शन लालस लोचन आतुर
हृदय अनावर
स्वर अधरावर
भरलें पुलक परागे ! १
चराचरावर अनन्तयौवन
स्वरसंमोहन
नवसंजीवन
आळविण्या तुज लागे । २
( बा. भ. बोरकर—दूधसागर. पृ. ३५ )

ह्या कवितेची चाल ताम्ब्यांच्या सखि आली या कवितेसारखी कांहीं अंशी असली तरी त्या कवितेहून प्रस्तुत कविता पुष्कळच भिन्न आहे. ' सखि आली ' ही ताम्ब्यांची कविता दुसऱ्या गटांत म्हणजे मिश्रावर्तनी वृत्तें, जाति आणि छन्द यांत येते. प्रस्तुत कवितेचें ध्रुवपद मात्र भृंगावर्तनी आहे. ' सखि आली ' या कवितेच्या जातीसाठी पुढे क्रमांक ४४ पहा.

४

२० इरली [ । प । – – + ] अचलगति दोन
[ । प ] पद्म दोन
[ । प । + ] पिशंग एक

थाम्ब ग पोरी पळभर थाम्ब् !
पायिं लागती चटके ग,
जाइल तापुनि डोकें ग,
तूं मधुराणी,
नग अनवाणी,
तुला जायचें लाम्ब् ।
तुझ्याच ग या येइं घरी
जल शीतल घे पिउनि तरी,
येथिल छाया
लाविल माया
जरा पुसुनि जा घाम् ।
( स्वकृत—अप्रकाशित )

' देवबाप्पा ' या बोलपटांतील ' नाच रे मोरा अम्ब्याच्या वनांत ' हें सुप्रसिद्ध गीत बरेंच शिथिल पण याच जातींत आहे. ' इरली ' हे नांव याच गीतांतून घेतलें आहे.

२१ प्रतीक्षा : [ । प ] पद्म एक चरण
[ । प । प ] पादाकुलक एक चरण
[ । प । – + ] शुद्धसती एक चरण

... अधिकच खुपते
स्थिरावलेले शब्द जिभ्यावर
ती चिरपरिचित कक्षा !
मनांत उरतें
काळोखांतच हुरहुरणारी
धूसर आर्त प्रतीक्षा !
( मंगेश पाडगांवकर–जिप्सी. पृ. १०५ )

या कवितेंत यमकें कडव्यांशी साधलेलीं आहेत.

### भृंगावर्तनी विषमजाति

२२ दीपज्योत [ । भृ । + ] अेक
[ । भृ । भृ ] जीवनलहरी दोन वा अधिक
[ । भृ । भृ । भृ । + ] धवलचन्द्रिका अेक.

दीप जाइ का ?
वाऱ्याची येइ धाड
धरिला मी पदर आड
ज्योत मालवून गेली त्याचपायिं का ?

फूल मलुल का ?
कळवळली प्रीत उरीं
कवळुनि मी त्यास धरी
आंच लागली म्हणून मलुल फूल का ?
( ग. न. पंडित–फुलबाग. कविता ५२ )

गट पहिला–समावर्तनी छन्द

अ विभाग—छन्द

समछन्द ( वर्ग पहिला )

पद्मावर्तनी समछन्द

२३ दैवगती [ । प । –, – – । प । – – ]
दिन अजुनी नाही पुरता बुडाला
अजुनी न तो जत्रा बाजार सम्पला
दैवगतिने नाही पुरे नागविलें
थोडे फार ते आहे गांठीस ठेविले !
( ग. न. पंडित—फुलबाग. कविता ७१ वी )

अर्धसम छन्द ( वर्ग दुसरा )

पद्मावर्तनी अर्धसम छन्द.

२४ निर्माल्य : [ । प । प ] पादाकुलक
[ । प । प । – – ] वंशमणी
अलीकडे लपवितो
तुझ्यापासून मी माझी व्यथा !
सांगायची टाळतो मी
आंसवांत भिजलेली कथा !
तुझ्याभोंवतीं घोटाळे
माझ्या मनच्या फुलांचा वास
तुझ्या दृष्टीपलीकडे
निर्माल्याची पण जमे रास !
( मंगेश पाडगांवकर—जिप्सी. पान ८० )

२५ आभास [ – – । प । – ] भुवनसुन्दर
[ – – । प । प । प । – ]
उद्या जायचें तुला
आजपासूनीच होइ कसें कसेंसें मला !
कधी येशील पुन्हा
रोज परी आभासांत गडे भेटत जा ना !
( स्वकृत—अप्रकाशित )

भृंगावर्तनी अर्धसम छन्द

२६ निवान्त [ । भृ । भृ । भृ । – – ] परिलीना
[ । भृ । – –, । भृ । – – , । भृ । – – ]

कोंवळ्या पाण्याचा लख्ख आरसा
त्यांत डोकावे —० शुभ्र ढगाचा —० गुल्जार ससा !
सळसळत हा पळस उभा
दूर न्याहळी—देवालयाचा—कळस नभा !
आकाश हंसरे फेनिलकान्त
पाहत जळीं—एकला बसे—स्निग्ध निवान्त !

( मंगेश पाडगांवकर–जिप्सी, पान ५६ )

२७ मन्थर [ । भृ । – – ]
[ । भृ । भृ । भृ । – – ] परिलीना

रात्र भिजली
कांपऱ्या तन्द्रींत पानें निजलीं
दाट सांवल्या
पागल...मन्थर...भारावलेल्या !

( ( मंगेश पाडगांवकर–जिप्सी. पान ५७ )

विषम छंद : प्रकार पहिला ( वर्ग तिसरा )

२८ चिमणी [ । प । प । प । प । ] दोन वा अनेक
[ । प । प । प । – – + ] हरिभगिनी एक

ताअी नको रडूं बाअी रडूं मला दाटतें
तुझे आसूं माझ्या गालीं ओघळती वाटते !
देतो तुला माझा खेळ ताअी नको ग रागावूं
चिमणीच्या दातांनी ( ग ) माझ्यांतला देतो खाऊ
पापे देतो गालाचे मी पेढ्याहूनि गोड ते ।

( ग. दि. माडगूळकर—' अबोली ' बोलपट )

वर कंसांत दिलेल्या स्थानीं एका अक्षराची गरज आहे. " अबोली " च्या पुस्तकांत दिलेल्या पद्यांत कदाचित मुद्रणदोषामुळे तेथे अक्षर छापण्याचें राहिले असावें. किंवा खरोखरच गाण्यांत तें अक्षर नसेलहि व कमी मात्रांची कूस आलापांनी भरून काढली असेल. मूळ गाणें कशाप्रकारें म्हटलें गेलें आहे तें माझ्या लक्षांत नाही.

पद्मावर्तनी विषमछन्द

२९ गुंजन [ । प । –, – – । प । – ] चन्द्रकला एक
[ प । प । प – ] पतितपावन दोन वा अधिक

डोलत चाले अरू नाचत बोले
हातवारे करूनीयां मोडितो डोळे,
ओहळ वा खडकाळींतून ओघळे !
वाकडा चाले ओठीं सूर निघाले

गोड संगीताने सारें घर घुमलें,
भ्रमराने घरांत कीं गीत गुंजलें ?

( गिरीश—चन्द्रलेखा, कविता ९)

या कवितेच्या कडव्याची घटना पहातां हा विषम-छन्द प्रकारांत मोडतो. अर्थात् गिरीशांनी चन्द्रलेखेंत लिहिल्याप्रमाणे हा शुद्ध चन्द्रकान्त (पतितपावन) छन्द होऊं शकत नाही.

३० किलबिल : [ । प । – – ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ । प । – – ] गजवदन अनेक
[ । प । प । – – ] वंशमणी एक
तुझी माझी जन्माचीच जोडी
आली संसारी अथांग गोडी–ग... धृ.
पोरंवाळ गुणी—०झाल्या हिरेखाणी
किलबिल घरीं—०झाली गोड गाणीं
सूर आपल्या तारांना जोडी—ग

( गिरीश—मानसमेघ. )

गिरीश यांच्या ‘ मानसमेघ ’ मधील ‘ सुखीसंसार ’ ही वर दिलेली कविता आणि चन्द्रलेखेंतील ‘ लडाई ’ ही कविता या दोन्हीहि या किलबिल छन्दांत आहेत परंतु गिरीशांनी त्यांना नववधू छन्द असें जे नांव दिलेलें आहे तें मात्र बरोबर वाटत नाही. नववधू छन्दाचें लक्षण

[ । प । प ] ( अक्षरें आठ ) अनेक
[ – । प । – – – ] ( अक्षरें आठ ) एक.

असें होईल. पण उ र्युक्त कवितांचें पृथक्करण वर सुरवातींत लक्षणांत दिल्याप्रमाणे पडतें म्हणून त्या कवितांचा नववधू छन्द असणें शक्य नाही.

‘ सुखी संसार ’ पेक्षा ‘ लडाई ’ ही कविता पुष्कळच शिथिल आहे.

३१ सुनील [ । प । – ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ । प । – ] आन्दोलन अनेक
[ । प । – ] पिशंग एक
कशास येतो—०तरुण पान्थ
उजाडतांच—०माझ्या दारांत
असा फिरत !
त्याचीये मुखीं—डोळे लागती
काय करूं गे—आवरूं किती
कुठे ऐकती ?
असोत काळा—रात्रीं ढगाळ
किंवा शारदी—नभ निर्मळ
गोड सुनील !

( ग. न. पंडित—फूलबाग, कविता २१ वी )

शरच्चन्द्र मुक्तिबोध यांची ‘ कष्टाचें गीत ’ ही कविता ( नवी मळवाट-पान १८ ) या सुनील छन्दांत आहे. तरीहि त्यांत थोडें शैथिल्य आहेच.

३२ बरसात [ । प । – – ] शुद्धसती छन्द दोन
[ । प । प । प । ] अनलज्वाला दोन वा एक

माझ्या दादाचं आज ग लगीन् लगीन्
बोलते मी लाडकी ग वहीण् वहीण् ! ध्रु.
येईल वरात
होईल् वरसात
कौमुदीची, चान्दणी ही रात रात !
दारांत दोघांची दृष्ट काढीन् काढीन् !
( स्वकृत—अप्रकाशित )

### भृंगावर्तनी विषमछन्द

३३. शिशिर : [ । भृ । भृ । – – ] दोन चरण
[ । भृ । भृ । भृ । – – ऽ ऽ । भृ । भृ । – – ] एक
शिशिरांमधल्या उत्तर रात्रीं—आकाश मनांत झुरे
निष्पर्ण तरूंच्या भोवती वारा—उदास होऊन फिरे
दुरून एकला तारा
करितो गूढ इशारा
गहन कोषांत तमाच्या उरीं—कुणाची वेदना स्फुरे !
( मंगेश पाडगांवकर–जिप्सी. पृ. १३ )

३४. आकाशवीणा : [ । भृ । – – ] एक चरण
[ । भृ । भृ । भृ । – – ] दोन वा अधिक
शान्त किनारा, ध्रु०
स्निग्ध पहांटे
कोवळें आकाश लाटांत दाटे
दूरांत अन्धुक चमके तारा
शान्त किनारा !
कांपरें पाणी
सुरूच्या वनांत धूसर गाणीं
आतुर आकाशवीणेच्या तारा
शान्त किनारा !
( मंगेश पाडगांवकर—जिप्सी पान ४९ )

‘ शान्त किनारा ’ हे शब्द प्रत्येक कडव्यांत पुनरुक्त झालेले आहेत. म्हणजेच तेव्हढा विभाग ध्रुवपद आहे. कडव्याच्या घटनेचा विचार करतांना ध्रुवपद विचारांत घ्यावयाचें नसतेंच ( पहा छन्दोरचना ३३६ पान ) कारण ध्रुवपद हें जाति वा छन्दप्रकाराचें निर्णायक नसतें !

### विषमछन्द : प्रकार दुसरा ( वर्ग चौथा )

### पद्मावर्तनी विषमछन्द

३५. इरली : [ । प । – – – ] अचलगति दोन
[ । प ] पद्म दोन
[ । प । – ] पिशंग एक

चातका रे, बघ तरी आकाशांत ते ! धृ.
मेघ काळे काळे रे,
वरसत आले रे,
चंचू वरी
आतां करी
झेली थेम्ब ते !
झिमझिम चालली,
भिजली ना इरली,
रे तरीही
अजुनी ही
वीज नाचते ! २ (स्वकृत—अप्रकाशित)

३६ तूलिका : [ । प । – – + ऽ ऽ । प । + ⏑ ] जाति दोहा दोन चरण
[ ⏑ ⏑ –, ⏑ ⏑ –, ⏑ ⏑ –, ⏑ ⏑ – ] वृत्त त्रोटक एक

बघ बालविभाकर ये उदया,
तम जाय हळूहळु हे विलया धृ.
अतुल तूलिका घेउनी निजकिरणांची काय ?
कौशल्याने रंगवी तो प्राचीचा काय
मय ही न करी असली किमया
(भ. श्री. पंडित–उन्मेष आणि उद्रेक. पान २२)

हा विभाग बराच मागे पडलेला दिसतो. आजच्या मुक्तछन्दाच्या काळांत याचा भविष्यकाळहि अनिश्चितच वाटतो. वर दिलेल्या ह्या एका कवितेखेरीज जाति–वृत्तांतील रचना नाहीच. उदयोन्मुख कवींकडून अशा प्रकारच्या रचनेची आशा करावी काय ?.

[ उत्तरार्ध पुढील अंकीं ]

पुस्तक–परीक्षण

# शिवरामपंत परांजपे.

कै. शिवरामपंत परांजपे यांचे नातू श्री. वामनराव यांनी शिवरामपंतांच्या चरित्राचा हा दुसरा खंड लिहून पंतांचें चरित्र आतां पूर्ण केलें आहे. या खंडाला लोकनायक श्री. बापूजी अणे यांनी पुरस्कार लिहिला असून ' परांजपे–महोदय–प्रशस्ति ' म्हणून त्यांनी एक संस्कृत श्लोकहि लिहिला आहे. ' शिवरामपंत व त्यांचा काल; व्यक्तिमत्व, वक्तृत्व व वाङ्मय ' असे चार विषय या ग्रंथांत आलेले आहेत. वामनराव यांचे वडील कृष्णाजीपंत हे तरुणपणींच वारले. आणि ' स्वराज्य'पत्राचें संपादकत्व जरी त्यांनी केलेलें असलें तरी लेखनकलेचा पूर्ण विकास करण्यास अवश्य असलेली सवड वकिलीच्या धंद्यामुळें त्यांना सांपडली असें दिसत नाही. वामनरावांची बहादुरी अशी कीं, आपला वकिलीचा धंदा सांभाळूनहि, आजोबांच्या सहवासांत अंशतः तरी प्राप्त झालेली लेखनाची कला त्यांनी चांगली पुष्ट बनविली; तिचा मनोज्ञ आविष्कार शिवरामपंत–चरित्राच्या दोनहि खंडांत दिसून येतो. वामनरावांच्या लेखनांतील मुख्य गुण म्हणजे त्यांतील विवेचन हा होय. पुन्हा पुन्हा वर्णनाचा आश्रय करून लेखकाला आपलें लिहिणें सुरस बनवितां येतें. पण विवेचनाच्या बळावर लेखन सुरस करणें ही फार अवघड कला आहे आणि लिहिण्यास अत्यंत आनंद वाटतो कीं, वामनराव यांनी ही कला पूर्णपणें साध्य केली आहे. अलंकाराचाहि फारसा आश्रय न घेतां त्यांनी आपल्या लेखनाला गोडी निर्माण केलेली आहे. हा त्यांच्या लेखनाचा आणखी एक विशेष होय. शिवरामपंतांच्या काळांत या दुय्यम इलाजाचा अवलंब वाचकांना फार रुचकर वाटत असे, पण आतां रुची बदललेली आहे. जेथे तेथे वर्णनें किंवा अलंकार हीं भेटूं लागलीं तर रसिक वाचक लेखकाच्या सामर्थ्याविषयीं कांहीसें निराळें मत बनवितो. पण जर का त्याला विवेचन, चिकित्सा, वादकौशल्य हीं भेटूं लागलीं तर त्याला खराखुरा आनंद होतो. वामनराव यांनी लेखनांतील हे उत्तरोक्त विशेष ठिकठिकाणीं प्रगट केले आहेत आणि त्यामुळे आपण एका बुद्धिमान् माणसाचें वाङ्मय वाचीत आहोंत असा आपला ग्रह होतो.

शिवरामपंतांच्या घरगुती जीवनाचें वामनराव यांनी काढलेलें चित्र अतिशय देखणें आणि सुबक आहे. त्यांच्या वक्तृत्वाचें त्यांनी केलेलें वर्णन, व या वर्णनाला पुष्टि आणण्यासाठी त्यांनी दिलेलीं अवतरणें हीं सुद्धा अत्यंत सुरस आणि यथातथ्य रूपाचीं वाटतात. स्वभावाचें वर्णन करतांना वामनरावांच्या लेखनाला विशेष तेज चढलें आहे. ते म्हणतात, " शिवरामपंत कोणाचें दास्यत्व (?) पत्करणार नाहींत. बौद्धिकसुद्धा नाही मग शरीराचें तर नाहीच नाही. त्यांची लव्हाळ्याची वृत्ति नव्हे. वाकेन पण टिकेन असे कांहीजण असतात, मोडेन पण वांकणार नाही अशी शिवरामपंतांची वृत्ति होती. जगेन तोपर्यंत मानानेच जगेन......असें शिवरामपंतांचें न बोलतां आचारांत आणलेलें जीवनविषयक तत्त्वज्ञान होतें.......परंतु मनुष्याचा स्वभाव देखील चळ आणि परिस्थितिसापेक्ष असतो. मोठ्या माणसांचें वर्णन विरोधाभासाचा आश्रय केल्याखेरीज बरोबर होऊं शकत नाही; किंबहुना माणूस जितका अधिक थोर आणि उच्च पातळीवरचा तितका त्याच्या स्वभावांतला विरोधाभास अधिक

अनुक्रमणिका

तीव्र असें म्हणावें लागतें. '' व्यक्तिमत्वाविषयीं लिहितांना वामनरावांनी म्हटलें आहे कीं, '' शिवरामपंत वैयक्तिक टीका करीत नसत. स्वकीयावर तर, कमरेखालचा वार त्यांनी उभ्या जन्मांत केला नाही. भाषण, लेख, पुस्तक, नाटक कांहीहि असो. एकदा हातावेगळें झाल्यावर त्यावर कितीहि भडिमार होवो त्याला उत्तर म्हणून द्यावयाचें नाही अशी परांजपे यांची पद्धत होती......''.

श्री. वामनराव यांनी शिवरामपंताच्या काळाविषयी म्हणजे तेव्हाच्या राजकारणाविषयी पुष्कळच लिहिलें आहे. शिवरामपंतांनी पक्षांतर केलें, जन्मभर हिंसेचा प्रचार करतां करतां ते शेवटी अहिंसेचे प्रतिपादक बनले, मानीपणा सोडून त्यांनी नव्या तत्त्वज्ञानाचें अनुयायित्व पत्करलें अशा सारखे अनेक ठिकाणीं झालेले आरोप खोडण्याच्या ईर्षेने वामनरावांनी हें पहिलें विस्तृत प्रकरण लिहिलेलें आहे. या प्रकरणासंबंधाने थोडेसें विस्ताराने लिहिलें पाहिजे. शिवरामपंत हे स्वातंत्र्यविचाराचें पहिले उद्गाते होत हा वामनरावांचा पक्ष कोणीहि मान्य करील. मराठींतील वृत्तपत्रीय वाङ्मयांत शुद्ध स्वातंत्र्यावर आपल्या प्रतिभेचा गुंजारव त्यांच्याइतका आणि त्यांच्या आधी कोणीहि केलेला नाही हें ऐतिहासिक सत्य आहे. हा मान शिवरामपंतांच्यासाठी कायमचा राखून ठेवावयास हवा. मात्र शुद्ध स्वातंत्र्यावर त्यांची दृष्टि खिळलेली असल्यामुळे, चालू चळवळीसंबंधाने त्यांच्या मनांत उपेक्षा उत्पन्न झालेली होती. आणि केव्हा केव्हा तर या चळवळीची ते अवहेलना करीत. एका स्वातंत्र्यावाचून हें सर्व फोल आहे असा त्यांचा दावा होता. टिळक होते तेवढे जर आक्रमक बुद्धीचे, निर्भय वृत्तीचें आणि प्रयत्नवादी नसते तर शिवरामपंतांच्या या स्वातंत्र्याच्या लेखनावर सर्वथा संतुष्ट होऊन तेव्हाच्या तरुण लोकांनी टिळकांचा नाद केव्हाच सोडला असता. पण टिळकांचे खरें वैभव हें कीं, पंतांचें हें स्वातंत्र्यगायन एकीकडे चालू असतांना सुद्धा आणि दुसरीकडे नेमस्त पक्षाची टीका सुरू असतां त्यांनी महाराष्ट्रांतील सर्व तरुणवर्ग हस्तगत करून टाकला. शिवरामपंत हे टिळकांच्या पेक्षा मोटे होते असें वामनराव यांना म्हणतां येत नाही इतकेंच; पण त्यांनी तसें कोठें कोठें भासविलें आहे हें रसिक वाचकांच्या खचित् ध्यानांत येईल ! वामनरावांनी तुलना करतां करतां विष्णुशास्त्र्यांनाहि कांहीसें बाजूस सारलें आहे. 'मी महाराष्ट्रभाषेचा शिवाजी आहे' या खाजगतात आणि सहजासहजी काढलेल्या विष्णुशास्त्र्यांच्या उद्गारांना, लक्ष्मणराव चिपळूणकर यांनी वाङ्मयीन व ऐतिहासिक महत्त्व प्राप्त करून दिलें हीच मुळांत चूक झालेली आहे. पण त्यांच्या उद्गाराचा वामनराव यांनी उपयोग करून घेऊन असें भासविलें आहे कीं, विष्णुशास्त्र्यांनी वाङ्मयांतील शिवाजीपणाचा राज्याभिषेक आपल्याला करून घेतला. पण शिवरामपंत हे त्यांच्यापेक्षा शिवाजीपणावर हक्क सांगण्याला जास्त पात्र असून सुद्धा त्यांनी विनयाने आपल्याच तोंडाने हा राज्याभिषेक करून घेतला नाही. टिळक आणि चिपळूणकर या दोघांच्याहि बाबतींत वामनरावांनी भीत भीत कसते वार केलेले आहेत ! या त्यांच्या साहसाने जाणिक माणसांचें फार झालें तर मनोरंजन होईल ! आणि आपल्या आजोबांचें स्तवन करतां करतां नातू थोडासा वाहवला आहे असें ते एकमेकांत हसून म्हणतील. तसेच शिवरामपंतांच्या श्रेयाची मोजदाद करतां करतां त्यांनां सशस्त्र क्रान्तीचा उठाव केला असेंहि वामनरावांनी सांगून टाकलें आहे. हें वाक्य वाचून तर, सशस्त्र क्रान्तीचा प्रत्यक्ष उठाव करून ज्यांनी जन्मच्या जन्म अंदमानांत आणि अज्ञातवासांत घालविले ते

लोकहितवादींपासून तों टिळकांच्यापर्यंत सर्वच मुत्सद्यांनी ती मान्य केली होती. नेमस्तपक्षाचा आणि राष्ट्रीयपक्षाचा जो झगडा होता तो या कौन्सिल–पद्धतीच्या स्वीकारासंबंधाने नव्हता; ही पद्धत कडक कशी बनवतां येईल; इंग्रजांना त्यांच्याच पद्धतीने नामोहरम कसें करतां येईल; आणि या पद्धतीला तीक्ष्ण लोकक्षोभाचा पाठिंबा कसा मिळवितां येईल, हें टिळक पहात असत. आणि याचें कारणहि इंग्रज लोकांच्या श्रद्धेंतच सांपडण्यासारखें आहे. लोकशाही तत्त्वावर आधारलेल्या कौन्सिलांतच आणि पार्लमेन्टांतच आपले भराभर पराभव होत आहेत, हें इंग्रजांना दिसलें असतें तर आपल्याच भूमिकेवर आपण नामोहरम होत आहोंत या जाणिवेने इंग्रज मुत्सद्दी हतवीर्य होऊन बसले असते. रणांगणावर शिपायांचा पराभव होणें यापेक्षा आपणच आंखलेल्या लोकशाहीच्या भूमिकेवर आपलाच पराभव होत आहे या जाणिवेचें दुःख इंग्रजांना सर्वथा दुःसह वाटतें. कारण त्यांच्या मनःपिण्डांत लोकांचें प्रातिनिधिकपण हें एक अद्भुत कलम कायमचें रुतून बसलें आहे. कौन्सिलप्रवेश करून, सर्व पुढाऱ्यांनी तेथे एकत्र जमून, व्हाइसरॉयच्या डोळ्यादेखत राजकर्त्यांच्या पराभवाचें सोरटच सुरू केलें असतें तर इंग्रजांचें मर्म बरोबर छेडलें गेलें असतें; आणि याचा प्रत्यय कौन्सिलांत आलाहि. मोतिलाल नेहरू, विठ्ठलभाई पटेल, चित्तरंजन दास यांनी दिल्लीच्या कौन्सिलांत इंग्रज राजकर्त्यांना खरोखर घाबरें करून सोडलें; म्हणून कौन्सिप्रवेशांत कांहीच चूक नव्हती.

पण शिवरामपंतांना कौन्सिलची मातब्बरी केव्हाच वाटली नव्हती. नगरपालिकेला तर ते केवळ 'खराट्याचें स्वराज्य' म्हणत आणि कौन्सिल म्हणजे याचीच एक मोठी आवृत्ति आहे असें ते मानीत असत व बोलूनहि दाखवीत. देशांत पार्लमेंटरीपद्धति रूढ झाली आहे आणि सर्व पुढाऱ्यांनी ती मान्य केली आहे हें त्यांना कधीं पटलेंच नव्हतें. टिळकांच्याशी त्यांचा जो सूक्ष्म मतभेद होता तो यांतूनच उद्भवला होता. तथापि वर लोकक्षोभाचा जो उल्लेख केलेला आहे तो चेतविण्यास आपण जे यत्न करीत आहोंत त्यांत शिवरामपंतांची आपल्याला मदतच होत आहे हें ओळखून टिळकांनी शिवरामपंतांना आपल्या पक्षांत कायमचें सामावून घेतलेलें होतें. इंग्रजाशी कांही काळ झगडा होऊन खुद्द कॉंग्रेसाह कौन्सिलांत शिरली यावरूनहि शिवरामपंतांच्या एकांगी मताचा चांगला बोध लोकांना झाला. देशांत दोन तऱ्हेचें राजकारण चालू ठेवण्यांत कांहीच चूक झाली नसती. पार्लमेंटमध्यें बसून इंग्रजाची त्याच्याच भूमिकेवर अडवणूक करीत राहणें आणि दुसरीकडे देशांत लोकक्षोभाचा वणवा पेटविणें या दोन्ही गोष्टी एकाच वेळीं सहज साधण्यासारख्या होत्या. दुर्दैव असें की, यांत परस्परव्यवच्छेदकता आहे असें ठरविण्यांत आलें. आणि पहिल्या पंथाचे लोक कमी देशभक्त आहेत असें ठरत गेलें ! राजकारणाच्या उंच भूमिकेवरून पाहतां इतिहासांतील ही एक विस्मयकारक घटना म्हटली पाहिजे. यावरून वाचकांच्या थोडें तरी ध्यानांत आलें असेल की, केळकरांचा आणि शिवरामतांचा मतभेद म्हणजे केळकरांचा कमकुवतपणा हा वामनरावांनी केलेला आरोप सर्वथा चुकीचा आहे. केळकर शिवरामपंतांच्यासारखे देशभक्तच होते. इतकेंच की, पार्लमेंटरी पद्धतीवर मुळीच विश्वास ठेवतां उपयोगाचा नाही, तो टाकूनच दिला पाहिजे, हा पंतांचा आग्रह त्यांना पटण्यासारखा नव्हता. तुम्ही त्या भूमिकेवरून लढा आम्ही या भूमिकेवरून लढतों असा गुप्त तहनामा तेव्हांच्या सर्वच राष्ट्रीय पुढाऱ्यांत झाला असता तर देशांतील किती तरी मनःक्षोभ वाचला असता आणि हीं प्रकरणें लिहिण्याच्या दगदगींतून वामनरावहि बचावले असते ! महात्मा गांधींना कौन्सिलें बिलकूल नको होतीं; आणि तात्यासाहेब केळकरांना तीं खासच हवीं होती. राष्ट्रभक्तांचा एक ताफा कौन्सिलांत ठेऊन देऊन महात्माजींनी बाहेरील

प्रांगणांतहि इंग्रजांना हैराण केलें असतें तर तें तात्यासाहेबांना नकोसें वाटलें असतें असें मुळींच नाहीं; शिवाय जो देशभक्त ज्या ठिकाणीं उपयोगी पडण्यासारखा होता तेथे त्याला योग्य ती संधी मिळाली असती. पण व्हावयास हवी होती ती गोष्ट घडली नाहीं. कालतीर्थांत आतां सारेंच पावन होऊन गेलें आहे ही गोष्ट निराळी !

तसेंच वामनराव यांनी शिवरामपंतांना अर्पण केलेली अनन्यसाधारणता अतिशयोक्तीने भरलेली आहे. 'तात्यासाहेब यांना पुढारीपण करतां आलें नाहीं' तें महात्मा गांधींच्याशीं तुलना करतांना करतां आलें नाही. महात्मा गांधींची झेंप फार मोठी होती हें निःसंशयच खरें आहे. पण तात्यासाहेबांनींहि 'मी तुमच्या बरोबरीचा आहें' असा दावा कधींच मांडला नाही. आणि जेवढ्यापुरता वाद त्यांनी केला तेवढ्यापुरतें त्यांनीं यशहि मिळविलें. शिवरामपंतांनी स्वातंत्र्याचें गायन केलें ही गोष्ट खरी आहे पण त्यांना पुढारीपण कधींच करतां आलें नाही. समाजांत स्वतःसंबंधीं आदर व कौतुक आणि देशासंबंधानें अभिमान हीं त्यांना उत्पन्न करतां आलीं. पण तात्यासाहेबांनी स्वतःला योग्य वाटणाऱ्या तत्त्वाचा जेवढा आग्रह धरला, तेवढासुद्धा शिवरामपंतांनी स्वतःच्या तत्त्वाचा धरला नाही. 'काळ'पत्राच्या ऐन उमेदींतील प्रतिपादनाचा सगळा झोक त्यांनी टाकून दिला. त्यांना दुसरा कोणी तरी पुढारी हवा असे. लेखनवक्तृत्वाची कला चालवावयास आणि स्वातंत्र्यप्रीति उत्पन्न करावयास त्यांना टिळकांचें छत्र उपयोगी पडलें, आणि मधूनमधून किंचित् नाखुषी दाखवूनसुद्धां ते टिळकांच्या छत्राखालींच कायम राहिले. नंतर महात्माजींच्या छत्राखालीं ते उभे राहिले आणि दुय्यम प्रतिपादकाची भूमिका त्यांनी खुषीने पत्करली. बुद्धिवान वाचकवर्गाला जो विषाद वाटला तो या गोष्टीचा वाटला.

परांजपे हे टिळकांच्यापेक्षा वरचढ होते या भ्रमांतून वामनरावांना मुक्त करावयास एक इलाज सुचविता येण्यासारखा आहे. पुढच्या वर्षी टिळकजन्माचा शताब्दि-महोत्सव काँग्रेसतर्फे सर्व भारतांत साजरा होणार आहे. तशा तऱ्हेची आज्ञा मुख्य कचेरींतून जिकडे तिकडे प्रसृत झालेली आहे. वामनराव यांनी काँग्रेस श्रेष्ठींना असें कळवावें कीं, 'शिवरामपंत परांजपे हे टिळकांच्यापेक्षांहि सरस होते आणि म्हणून जन्मशताब्दि–महोत्सवाचा मान आपण कांही वर्षांनी त्यांना अर्पण करावा, टिळकांना करू नये.' पण हें कळविण्याची वामनरावांची छाती होणार नाही. कारण काँग्रेस काय उत्तर देईल याची मनोमन साक्ष त्यांना खचित आहे. तसेंच महात्मा गांधींनी टिळकांच्या लगोलग पश्चात् एक कोटीचा टिळक स्वराज्य फंड काढला; पण शिवराम पंत वारल्यानंतर त्यांच्या लोकप्रियतेचा फायदा घेऊन असाच आणखी एक कोटीचा फंड काढावा असें महात्मा गांधींना कधी वाटलें नाही ! याचेंहि मर्म वामनरावांनी नीट ध्यानांत घ्यावें. 'मोडेन पण वाकणार नाही, सदा ताठच राहीन, मनाच्या विरुद्ध वागणार नाही' हा शिवरामपंतांचा बाणा होता असें वामनरावांनी पुन्हा पुन्हा प्रतिपादलें आहे, पण कौन्सिलवर विश्वास नसतांनासुद्धा टिळकांच्या काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षातर्फे कुलाबा जिल्ह्याचे प्रतिनिधि म्हणून शिवरामपंतांनी आपलें नांव उमेदवारांच्या यादींत घातलेंच होतें आणि अहिंसेवर कसलाहि विश्वास नसतांना तिच्या प्रतिपादनाची मिथ्या जबाबदारी त्यांनी स्वतःच्या शिरावर खुषीने घेतली. या सर्वांचा अर्थ काय होतो बरें ? याचा अर्थ एवढाच होतो कीं, आपलें मत बाजूला सारून पुढाऱ्यांच्या मताप्रमाणे ते वाकत असत. 'हृदयाविष्करण' हा शिवरामपंतांचा लेख वामनरावांनी पुन्हा एकदा वाचावा, आणि 'आमचा हट्ट असा कांहीच नाही; आमची ही गाजराची पुंगी आहे' इत्यादि त्यांच्या वचनांचा अर्थ काय होतो हें नीट पहावें. अच्युत-राव कोल्हटकरांनी एकदा कोठेसें म्हटलें आहे कीं, 'टिळकांचा मायेचा हात पंतांनी भिडकारून

टाकला.' यांतील दंश वामनरावांच्या लिखाणास निःसंशय बाधक ठरतो. वामनरावांनी ज्या केळकरांच्यासंबंधीं एवढें टाकून लिहिलें आहे त्यांच्यावर टिळकांनी आपला सर्व भार टाकला पण पतांच्यावर टाकला नाही. या गोष्टीचें ऐतिहासिक महत्त्व वामनरावांच्या ध्यानांत आलेलें नाही.

तसेंच, 'शिवरामपंत हे फक्त भोंदू सुधारकांवर टीका करीत पण वस्तुतः ते खऱ्या समाज-सुधारणेच्या विरुद्ध नव्हते' हा वामनरावांचा दावा कोणीहि माहितगार मान्य करणार नाही. वामनरावांचें हें म्हणणें जर खरें धरलें तर पुण्यांत आणि बाहेर सगळे भोंदू सुधारकच भरलेले होते असें म्हणावें लागेल! शिवरामपंत हे समाजसुधारणेचे भोक्ते होते, असें म्हणावयाचें तर त्यांनी कोणच्या कोणच्या सुधारणा सुचविल्या आणि कोणच्यासाठीं आग्रह धरला किंवा कोणच्या स्वतः अमलांत आणल्या, याचीहि माहिती वामनरावांनीं दिली असती तर बरें झालें असतें. 'पंतांनी कोणाला कमरेखाली वार केला नाही' हें म्हणणेंहि हास्यास्पद आहे. आणि लेखनांत व विशेषतः व्याख्यानांत, त्यांनी सुधारकांची आणि प्रतिपक्षाची केलेली उपरोधिक व विषारी थट्टा वामनरावांना ऐकावयास सांपडली नाही, हेंच बरें झालें.

केळकरांच्या प्रतिपादनामुळे महाराष्ट्र मागे पडला असें वामनरावांनी कां म्हणावें? कांही थोडेसे लोक आपल्या मताचा आग्रह धरून बसले असतील, पण, चिंतामणराव वैद्य, बापूजी अणे, वामनराव जोशी, मोरोपंत अभ्यंकर, गंगाधरराव देशपांडे, कृष्णाजीपंत खाडीलकर, शिवरामपंत परांजपे, काकासाहेब गाडगीळ, शंकरराव देव इत्यादि चट्सारी लहानमोठीं पुढारी मंडळी म. गांधींच्या पक्षांत सामील झालीं, हें आपल्याला प्रत्यक्ष माहीत आहे; आणि निवड-णुकींत तर केळकरांचा पक्ष सर्वथा नामोहरमच होत राहिला. मग असें असतांना महाराष्ट्र कां बरें मागें पडावा? हेहि लोक वगळून, मुख्य महाराष्ट्र निराळाच होता अशी वामनरावांची रुखरुख आहे काय? केळकर आणि त्यांचे चारदोन स्नेही हे दूर राहिले म्हणून महाराष्ट्र मागे पडावयाचें कांहींच कारण नव्हतें! आणि जर तो पडला आहे, असें वामनरावांचें मत असलें तर त्याचीं कारणें त्यांनी अन्यत्र शोधावयास हवींत.

वामनरावांनी ही खपली काढली म्हणून इतकें लिहावें लागलें. केळकर व परांजपे यांची गुणवैशिष्ट्यें वृत्तपत्रव्यवसायाच्या इतिहासांत आणि वाङ्मयाच्या दरबारांत खचितच कायम होणार आहेत; आणि प्रत्येकाच्या अंगांत कांही उच्च गुणांचें वास्तव्य असल्यामुळे पुढील पिढ्या त्यांना मानच देत राहतील. राजकारणाच्या वादळांतून बाहेर पडून, वामनरावांनी केळकरांच्या स्वभावाचें आणि त्यांच्या वाङ्मयाचें जें मूल्यमापन केलें आहे तें, हा डाव अंगलट येईल, हें ओळखून त्यांनी केलें नसतें तर या पुस्तकाची किंमत जास्त राहिली असती. पण आपल्या प्रतिपादनांतील हा आवेश वाङ्मयांत आणि राजकारणांत सध्या सुखरूप नांदू शकेल· अशा ईर्षेने त्यांनी या कामाला हात घातला हें दुर्दैव होय.

शिवरामपंतांचें खरें श्रेय आपण त्यांना अचूकपणें द्यावयास हवें. बंगालच्या फाळणीनंतर बंगाल्यांत जबरदस्त मतांतर झालें; आणि परांजप्यांना काँग्रेसमधून बहिष्कृत करावें असें आपल्या कमिट्यांतून ५-७ वर्षांपूर्वीं सुचविणारे लोकच बंडखोरीची भाषा बोलूं लागले! मवाळाचे जहाल झाले व जे जहाल होते ते स्वातंत्र्यवादी बनले. अशांनी आपल्या नवमताचे प्रतिपादक म्हणून 'वंदेमातरम्' पत्र सुरू केलें. व त्यांत स्वतंत्रतेची अत्यंत रसरशीत, तेजस्वी व गंभीर प्रतिपादनें येऊं लागलीं. पण तीं ज्यांनी वाचलीं त्यांना वाटलें कीं, हें सर्व मराठी भाषेंत व महाराष्ट्रांत एका स्वातंत्र्योपासकानें पूर्वीच केलेलें आहे. तेंच विचारवैभव, तीच प्रतिभा, तीच गंभीर धर्मबुद्धि, तोच धाडसी बेफिकीरपणा, तेंच

भविष्यत्कालाला कवटाळूं पहाणारें चैतन्य खुद्द आपल्या घरीं शिवरामपंतांनी आधींच दाखविलेलें आहे हें पाहून वाचकांना अभिमान वाटला. बंगाल्यांत जे विचार केवळ इंग्रजी जाणणारांनाच वाचतां आले ते येथे खास देशी भाषेंत हजारों वाचकांस आधींच वाचतां आले होते. म्हणून महाराष्ट्राने शुद्ध स्वातंत्र्योपासना ही बंगालपासून घेतली हा जो ध्वनि कोठे कोठे उठविला जातो तो साफ खोटा आहे. महाराष्ट्रांत शुद्ध स्वातंत्र्याची आवड आणि तिच्या जोपासनेस लागणारा तद्विषयक विचारांचा अखंड पुरवठा आधीच सुरूं होता आणि तो कै. शिवरामपंत यांनीच केला, हें निर्विवाद आहे. केवळ याच स्फूर्तिदायक मंत्राचा मूळ मांत्रिक कोण म्हणून शोधू जातां असें दिसून येईल की, कै. शिवरामपंत परांजपे हेच त्या मंत्राचे मांत्रिक होते. या स्वातंत्र्याच्या शिकवणीचा मूळ पाठ कोणीं दिला म्हणून जर पुढील शोधक इतिहासांत उरफाटा प्रवास करील तर त्यांस 'काळा' च्या फायलींतच शिरावें लागेल. बंगाल्यांतील स्वातंत्र्यवादी लोकांचें मुखपत्र 'वंदेमातरम्' हें होय. त्याचे मुख्य लेखक जे श्री. अरविंदबाबू यांची या बाबतींतील कामगिरी मोठी आहे. त्यांच्या विचारांत ओज आणि लेखनांत प्रचंड खळखळाट होता. त्यांनी कित्येक दिवस स्वातंत्र्य विचारांचा बेसुमार पाऊस पाडला. चालू रटमट जी असेल ती झिडकारून देऊन केवळ शुद्ध स्वातंत्र्यबुद्धीच्या वातावरणांत फिरत राहण्याची त्यांची हौस, तदनुसार धीरोदात्त विचार आणि सर्वांच्याहि वर त्यांची ती सिंधूच्या ओघाप्रमाणे खळखळ करीत आणि घोघावत रकानेच्या रकाने भरभरून वाहणारी डौलदार व काव्यमय इंग्रजी भाषा हीं पाहून तरुण पिढींतील लोक केवळ बेहोष होऊन जात असत ! पण ज्यांनी कै. शिवरामपंतांच्या स्वातंत्र्यपोषक वाङ्मयाची व त्या वाङ्मयाची तुलना केली असेल त्यांस दिसून आलें असेल की, एक इंग्रजी भाषा सोडली तर शिवरामपंतांच्या प्रतिपादनांतील विविधता, तात्त्विक गांभीर्य, गुलामगिरीच्या अवमानाची खणती, ऐतिहासिक देशाभिमानाची उत्कटता, काव्याची मनमुराद पेरणी हीं अरविंदांच्या लिहिण्यापेक्षा निःसंशय श्रेष्ठ होतीं. हेंच शिवरामपंतांचें लिहिणें जर इंग्रजी भाषेंत असतें तर त्यांची प्रसिद्धि आणि लोकप्रियता महाराष्ट्राच्या चतुस्सीमा ओलांडून अखिल भारतावर पसरली असती. पण तें झालें नाही. त्यांच्या उदात्त कल्पना महाराष्ट्राच्या चतुःसीमेंतच गुंगत राहिल्या. आणि यामुळे इतर बाजूंच्या राजकारणांतील व समाजकारणांतील पुढारीपणाचा मान जसा महाराष्ट्रास आपल्याकडे ओढता आला तसा स्वातंत्र्योपासनेच्या गुरुत्वाचा मान, शक्य असून त्याला इकडे आणतां आला नाही. पण हा मान जरी महाराष्ट्राला मिळाला नाही तरी स्वातंत्र्यकल्पना लोकांकडून शिकण्याचा प्रसंग त्याजवर आला नाही. आणि या सर्व गोष्टींचे श्रेय कै. शिवरामपंत परांजपे यांसच आहे. म्हणून त्यांचें नांव महाराष्ट्राच्या इतिहासांत 'शुद्ध स्वातंत्र्याचा महाराष्ट्रांतील पहिला प्रतिपादक" असेंच लिहिलें जाईल. शिवरामपंतांचा हाच खरा गौरव आहे.

शिवरामपंतांचा काळ फार मागे राहिला आहे, असें नाही. त्यांच्या संगतींतील लोक जरी आतां फारसे शिल्लक नाहीत तरी दर आठवड्याला प्रसिद्ध होणाऱ्या 'काळ' पत्रांतील त्यांचें वाङ्मय वाचलेले शेकडों लोक अजून जिवंत आहेत; त्यांचें तें खुमासदार वक्तृत्व ऐकून केव्हा प्रमुदित झालेले व केव्हां बेहोष बनलेले शेकडो श्रोते अजून जिवंत आहेत. अर्थात् वामनराव यांनी लिहिलेलें शिवरामपंतांचें चरित्र वाचून त्यांना काय वाटतें ही या चरित्राची पहिली कसोटी होय. तसेंच दुसरेहि कोणी अजून विद्यमान आहेत. शिवरामपंतांचें राजकारण, त्यांचें भाषणकौशल्य, त्यांच्या संभाषणांतील गुणदोष व खांचाखोचा कांहींशा बरोबरीच्या नात्याने किंवा कदाचित टीकाबुद्धीने पाहिलेल्या कांही माणसांना हें चरित्र वाचून काय वाटतें, ही या

चरित्राची दुसरी कसोटी होय. चरित्र किंवा इतिहास पूर्णपणें खरा वाटूं लागावयास आणि त्याला अविरोध मान्यता मिळूं लागावयास मध्यंतरी कांहीं पिढ्या गेलेल्या म्हणजे मेलेल्या असणें आवश्यक आहे असें दिसतें ! वर उल्लेखिलेलीं सर्व माणसें जोपर्यंत हयातींत असतील तोपर्यंत वामनरावांच्या या सर्वच्या सर्व लिखाणाला अविरोध मान्यता प्राप्त होईल असें मला वाटत नाहीं. ◆ ◆ ◆

श्रीपाद महादेव माटे

---

शिवरामपंत परांजपे [ ले. वा. कृ. परांजपे ]; मूल्य ५ रु.
चित्रशाळा प्रकाशन, पुणें २.

परीक्षणें

# डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या

डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांवरील ' टीकात्मक अभ्यासा'चा हा निबंधरूप ग्रंथ म्हणजे डॉ. द. ना. गोखले यांच्या डॉ. केतकरांवरील प्रबंधांतील एक प्रकरण. आतापर्यंतचें डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांवरील लेखन ' पुरेसें समावेशक, सुश्लिष्ट नि साधार ' होऊं शकलें नाही, अशी भूमिका स्वीकारून प्रस्तुत ग्रंथ हा अधिक समावेशक, सुश्लिष्ट आणि साधार व्हावा या अपेक्षेने हें लेखन गोखल्यांनी केलें आहे.

या अभ्यासांत प्रामाणिकपणा नांवाजण्यासारखा आहे. संकलन उपयुक्त आहे. या अभ्यासांत अवतरणें व तळटीपा भरभक्कम आहेत. मेहनत भरपूर आहे. विषयांची जंत्री समग्र आहे. पण टीकात्मक ग्रंथाला आवश्यक असलेल्या टीकात्मक मूल्यांचा अभाव आणि जेथे हीं मूल्यें वापरायचा प्रयत्न झाला आहे तेथे त्याची गल्लत पानोपान आढळते. कोणत्या टीका-प्रमेयांवर हा अभ्यास आधारलेला आहे तेंच कळत नाही. अभ्यास समावेशक करण्याच्या हेतूने सगळेंच घालायचें, कांही सोडायचें नाही, या पद्धतीने वर्णनात्मक तऱ्हेने सारें सारें कांही गोखल्यांनी या पुस्तकांत आणिलें आहे. बारीक-सारीक तपशिलाची जरासुद्धा कुठे उणीव नाही. मायन्यांची तूट नाही. परंतु विशिष्ट ठाम धोरण नसल्याने या पुस्तकांत एकसूत्रीपणाचा अभाव जाणवतो. कारण टीकात्मक वाङ्मयांतसुद्धा वेचकपणा आवश्यक असतो. टीकाकाराच्या निवडीच्या कुवतीनेच टीकावाङ्मयाला घाट येतो. डॉ. गोखल्यांनी निवड व गाळणें यांत कोणताच भेदभाव न ठेवल्याने त्यांनी जीं विधानें केलीं आहेत त्यांना धार आलेली नाही. डॉ. केतकऱ्यांच्या कादंबऱ्यांचा सांगाडा त्यांनी हाड नि हाड जुळवून तयार केला आहे. पण केतकर-वाङ्मयांतला रगेलपणा, रांगडेपणा आणि रसरशीत विनोदी जिवंतपणा यांचें दर्शन मात्र वाचकाला या अभ्यासांत व्हावें तसें होत नाही.

याचें कारण मला असें दिसतें की, ललितवाङ्मय, कला व बोध यांविषयीच्या डॉ. गोखल्यांच्या कल्पना अस्पष्ट आहेत. " सर्व ललितवाङ्मयाचा हेतु सौंदर्यदर्शन हा असतो आणि कादंबरी म्हणजे ललितवाङ्मयाचा एक प्रकार असल्यामुळे कादंबरीचा हेतुहि सामान्यतः तोच असतो. पण केतकरांच्या कादंबऱ्यांची चर्चा करतांना प्रारंभीं ही गोष्ट ध्यानीं घ्यावी लागते की, सौंदर्यदर्शनाच्या हेतूने केतकरांनी आपल्या कादंबऱ्या लिहिलेल्या नाहीत. ज्ञान विवरण, विवेचन, विचार वगैरे बुद्धीला उद्देशून लिहिलेल्या गोष्टींना जर ' बोध ' म्हटलें तर कांही बोध करण्याच्या प्रमुख हेतूने त्यांनी आपल्या कादंबऱ्या लिहिलेल्या आहेत असें म्हणतां येईल. त्यांनी आपल्या कादंबऱ्यांबद्दल ठिकठिकाणीं जे उद्गार काढले आहेत त्यावरून त्यांचा

डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या ( ले. डॉ. द. ना. गोखले;-व्हीनस प्रकाशन, पुणें; मूल्य रु. १–१५–०; पृष्ठें १४६ )

बोध करण्याचा हेतु चांगला स्पष्ट होतो " ( पृ. ४ ) हा परिच्छेद या अभ्यासाचें धोरण स्पष्ट करतो. आणि या परिच्छेदांतच गोखल्यांच्या टीकात्मक मूल्यांचा अस्पष्टपणा व गोंधळहि दिसून येतो. सौंदर्यदर्शन हा ललितवाङ्मयाचा हेतु असतो, हेंच प्रमेय आक्षेपार्ह आहे; आणि समजा, तें एक वेळ गृहीत धरलें तरी वाङ्मयीन सौंदर्याचे घटक काय, त्या सौंदर्याचें मूल्यमापन कसें करावयाचें, त्याची प्रतीति लेखक व वाचक यांच्या अनुभूतींतून कशी निर्माण होते, याविषयी कांही एक धोरण डॉ. गोखल्यांच्या समग्र विवेचनांत आढळून येत नाही. अनुभूतीचें महत्त्वच मुळी या टीका-विवरणांत गाळलें आहे. त्यामुळे सौंदर्य म्हणजे एक विरविरीत, झिलई असलेलें, सुबोधतेने सर्वांच्या पचनीं पडणारें, कांहीतरी गोड-गोड असें द्रव्य, असाच अभिप्राय काढायचा की काय? आणि समजा, या लोकमान्य सौंदर्यापासून डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या वंचित आहेत असेंहि मानलें तरी बोधवादाचें लोढणें जादा वजन अडकवून जें टीकाकाराने डॉ. केतकरांच्या वाङ्मयाच्या गळ्यांत बांधलें आहे, तेंहि मुळांतच विसंगतीने भरलेलें आहे. बोधाची वर दिलेली व्याख्याहि अशास्त्रीय आहे. ' ज्ञान ', ' विवरण ',' विवेचन ',' विचार' हे सारे शब्द शास्त्रीय दृष्टीने अपुरे, अगदी गुळगुळीत व झिजलेले आहेत. त्यामुळे अतिव्याप्तीने दूषित अशा या व्याख्येने बोधाचें आसनच मुळांत अत्यंत डळमळीत राहिलें आहे. आणि या बोधवादा-वरच लेखकाने आपल्या टीकेची उभारणी केल्यामुळे ( बोधाचें षड्विध स्वरूप, बोधहेतु आणि विषयनिष्ठ रचना, बोधहेतु व रचनेंतील तत्त्वनिष्कर्षणात्मक किंवा तात्पर्यात्मक भाग, बोधहेतु व एकात्मतेचा अभाव, बोधाविषयी आणखी कांही, इत्यादि भाग ) हें सर्व विश्लेषण सदोष झालें आहे. ' ज्ञानदान ', ' विचारकथन ' वगैरे विभागहि केवळ वर्णनात्मक असून त्यांत ज्ञान व विचार यांचीं अलग कार्यक्षेत्रें स्पष्ट होत नाहीत.

कलेबाबतहि डॉ. गोखल्यांनी कलामूल्यें म्हणजे काय, याविषयी निश्चित धोरण अवलंबिलेलें नाही. त्या बाबतींत कुसुमावतीबाईंचाच निर्वाळा त्यांनी दिलेला आहे.

मला वाटतें, कांही ठराविक साचेबंद व आता पुराणे झालेले वाङ्मयविषयक संकेत डॉ. गोखल्यांनी चिकित्साबुद्धि न वापरतां गृहीत धरल्याने असें झालें असावें. कारण बुद्धि व भावना यांच्यामधला तो जुना वाङ्मयीन निकष त्यांनी उचलून धरला आहे. वाचकाच्या भावनेला पटतें तें ललितवाङ्मय, बुद्धीला पटतें ते बोधवाङ्मय किंवा ललितेतर वाङ्मय असा त्यांचा समज दिसतो ( पृ. ८ ). भावनात्मक वाङ्मयांत सौंदर्याचा आढळ होतो, असें त्यांच्या विवेचनावरून वाटतें. दुसरें म्हणजे सौंदर्यपरिपोषाला कादंबरी-सारख्या ललितवाङ्मयप्रकाराची भाषा ललित व सुंदर असावी, असें डॉ. गोखले म्हणतात. पण सुंदर भाषा बनण्यास ' तिला अलंकार व कल्पना ' यांची जरूर असते असें जें त्यांचें म्हणणें आहे ( पृ. १०७ ) त्याबद्दल आधुनिक टीकाकारांचें दुमत होणें शक्य आहे. अलंकाराबरोबरच रसपरिपोषाचा त्यांचा आग्रहहि ( पृ. ११० ) अर्वाचीन ललितवाङ्मयाची उभारणी रसतत्त्वाहून अतिशय वेगळ्या तत्त्वांवर होत असल्यामुळे सयुक्तिक वाटत नाही.

' डॉ. केतकरांची प्रतिभा क्षीण होती ' ( पृ. ११२ ) हें विधान करतांनाहि प्रतिभेची कक्षा डॉ. गोखले स्पष्ट करीत नाहीत. प्रतिभा म्हणजे कल्पना कां ?

समाजशास्त्रीय भूमिकेबद्दलहि असाच गोंधळ झालेला आहे. डॉ केतकरांच्या कादंबऱ्या या मूलतः समाजशास्त्रीय कादंबऱ्या आहेत, हें डॉ. गोखल्यांनी केलेलें विधान अगदी बरोबर आहे. पण समाजशास्त्रीय कादंबरीला पहिल्याने निकष समाजशास्त्रीय व मागाहून कलामूल्यांचा लावायचा. असें धोरण ठेवणें आवश्यक ठरतें; तसें न केल्यानेच सबंध अभ्यासांत निश्चित

धोरणाचा अभाव जाणवतो. डॉ. केतकऱ्यांच्या कादंबऱ्या उघड समाजशास्त्रीय असल्याने समाजशास्त्रीय मूल्यांना टीकेंत अधिक अवसर मिळावयाला पाहिजे होता. पण अवघ्या दोन पानांत समाजशास्त्राची वासलात या निबंधांत लावली गेली आहे. 'समाजवर्णन', 'समाजबद्ध व्यक्ति' अशासारख्या शब्दांना समाजशास्त्रीय पक्कें धोरण न आखल्यामुळे वजन राहिलेलें नाही. कारण ज्या समाजशास्त्रीय धोरणाने डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांत गोखल्यांना बोधाचाच भास झाला, सौंदर्याची हानि वाटली, पात्रें जिवंत, रसरशीत असूनहि कलाहीन वाटलीं, वास्तव वातावरणाचा आढळ झाला, त्या सर्वांच्या मुळाशीं डॉ. केतकरांचें संपूर्ण शास्त्रीय असें समाजशास्त्रीय तत्त्व आहे. तें तत्त्व गतिशीलतेचें (dynamic force) आहे. समाज ही कांही static किंवा सांचीव वस्तु नाही. तो सारखा हालत असतो. परिवर्तन पावत असतो. व्यक्तींच्या हालचालींमुळे समाज गतिशील होतो व समाजाच्या गतिशीलतेने व्यक्तींच्या आयुष्यांत संघर्ष निर्माण होतात. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांतील व्यक्ति समाजबद्ध आहेत त्या अशा रीतीने डॉ. केतकरांना या गतिशील जिवंत समाजाचें चित्र रेखाटायचें होतें. केवळ लँडस्केप करायचे नव्हते. त्यांचा वास्तवतावादहि या गतिशीलतेचाच परिपाक आहे. या वास्तवतावादांत व पाश्चात्य कादंबरींतल्या sur-realism-मध्ये व एमिल झोलाच्या कादंबऱ्यांतल्याहि वास्तवतादर्शनांत खूपच फरक आहे. वरें, समाजशास्त्रीय कादंबरींतहि त्यांनी समाजशास्त्रीय प्रमेयांचें सोदाहरण विवेचन म्हणून कादंबरीला वेठीस धरलेलें नाही, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. त्यांनी जें समाजशास्त्राचें ध्येय दिलें आहे तें असें की, जो पडला असेल त्याच्यावर कोरडे ओढावे असें जगाचें धोरण असतें. आणि त्यामुळे जगांत व्यक्ति कठोर होतात व समाजाचें स्वास्थ्य भंग पावतें. जो पददलित असेल त्याला न्याय मिळवून देणें हें समाजशास्त्राचें ध्येय आहे. त्याचप्रमाणे व्यक्ति पाप कां करते ? तर ती कुठल्या तरी कारणाने दुःखी असते म्हणून. अशा प्रकारें मानवतावादावरच डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांची रचना झालेली आहे. आणि म्हणून त्यांतलें वातावरण खूप उंच आणि मोठें आहे. डॉ. केतकरांचें समाजशास्त्र हें समाजांतल्या अनेक processes-चें दिग्दर्शन व्यक्तींच्या व्यवहामार्फत करतें; अनेक क्रियाहेतूंचें स्पष्टीकरण ते समाजशास्त्री म्हणून करतात, पण त्यांची भूमिका बोधवाद्याची नाही. त्यांनी दिलेली वैजनाथ-स्मृतिच याची साक्ष आहे. डॉ. केतकरांना बोधच करावयाचा असता तर नाथमाधवांप्रमाणे अगर ना. ह. आपट्यांप्रमाणे बोधपर भाष्यें त्यांना ठिकठिकाणीं करतां आलीं असतीं. स्त्रीपुरुषांचा संबंध सुखाचा व्हावा म्हणून किती अंगांनी व समंजसपणें त्याचा विचार झाला पाहिजे हें दाखवण्यासाठी त्या निष्कर्षांना पेलून धरणारें वैजनाथशास्त्र्यांचें जिवंत व रसरशीत पात्र त्यांनी निर्माण केलें. हें पात्र 'प्रियंवदे'त व 'ब्राह्मणकन्ये'त उगीच आणल्यासारखें आलेलें नाही. समाजांत कोणतीहि सुधारणा करा, तिची प्रतिक्रिया ठरलेलीच असते. व अशा क्रिया, प्रक्रिया व प्रतिक्रिया यांनीच समाजांत गतिशीलता येत असते, हें गृहीत धरल्याने डॉ. केतकर कोणत्याहि ठराविक सामाजिक मतप्रणालीच्या आहारीं गेलेले नाहीत. बुवाबाजीचें समर्थन ते करतात असा आक्षेप त्यांच्यावर घेण्यांत येतो, पण समाजांत कोणतीहि गोष्ट कुणाला तरी उपयुक्त असल्याखेरीज टिकूं शकत नाही, या समाजशास्त्रीय निकषावर तोहि भाग घासला गेला आहे. समाजाच्या विविध घटकांचीं विविध सुखदुःखें व आकांक्षा असतात. त्यांतले कांही घटक त्यांनी आपल्यापुढे व्यक्तींच्या रूपांत मांडले. असें मनमोकळें, क्वचित् स्वैर धोरण ठेवल्यामुळेच आग्रहीपणा त्यांच्या लेखनांत आलेला नाही. उदाहरणार्थ,

अधर्म संततीचें संरक्षण या विषयावाबतींतलें ' परागंदा ' व ' ब्राह्मणकन्या ' यांतील मत-परिवर्तन पहा. त्यांच्या विचारांनी ' ब्राह्मणकन्ये 'त उच्चतर मानवतावादी पातळी गाठलेली आढळून येते.

डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या समाजशास्त्रीय असल्यामुळे प्रत्येक कादंबरींत व्यक्तींच्या गतिशील जीवनांतल्या संघर्षांचा परिपाक होऊन एक समस्या निर्माण झालेली आढळते. मात्र पात्रें व कथानकाचा ओघ यांना कादंबरीच्या तंत्रांत केतकरांनी दुय्यम स्थान दिलें आहे. समस्या कादंबरीची गळचेपी कुठेच करीत नाही. ही समस्या व त्या समस्येभोवती असलेल्या क्रिया व प्रक्रिया त्यांनी कादंबरींत सूक्ष्मतेने दाखविलेल्या आढळतात. आणि म्हणून या कादंबऱ्यांचें परीक्षण करतांना प्रत्येक कादंबरी स्वतंत्रपणेंच चर्चिली गेली पाहिजे. कारण कादंबरींतील प्रत्येक व्यक्ति या प्रक्रियेचा एक महत्त्वाचा घटक आहे. प्रत्येक घटनेला काळाचें व गतीचें प्रमाण आहे. डॉ. गोखल्यांनी हा क्रम तोडून एका दृष्टीने सर्व कादंबऱ्यांची पाहणी करावी, मग दुसऱ्या दृष्टीने पुन्हा सर्व कादंबऱ्यांची पाहणी करावी, असा क्रम स्वीकारल्यामुळे पुस्तकांत विचाराचा ओघ कायम राहिला नाही.

डॉ. केतकरांच्या कांही पात्रांना डॉ. गोखल्यांनी जिवंत व रसरशीत म्हटलेंच आहे. जिवंत पात्रें निर्माण करणारें वाङ्मय कलाहीन असतें का ? की आमच्या कलेच्या कल्पनाच ठरीव ठशाच्या बनल्या आहेत ? मला वाटतें की, डॉ. केतकरांनी अप्टन सिंक्लेअर, बर्नार्ड शॉ, एच्. जी. वेल्स यांहूनहि आपल्या पात्रांना अधिक स्वतंत्र ठेवलें आहे. एकदा एका व्यक्तीची रेखा ठरली की, ती व्यक्ति स्वतःच्या धोरणाने स्वतःच्या खऱ्याखुऱ्या परिस्थितीशीं झुंजतांना दिसते. ती डॉ. केतकरांच्या मुखाने बोलत नाही. भाषा डॉ. केतकरांची पण व्यक्तित्व संपूर्ण तिचें. डॉ. केतकर आपल्या पात्रांत कधी लुडबूड करीत नाहीत. त्यांच्या कादंबरीलेखनाचें मोठें यश मला हेंच वाटतें. म्हणूनच डॉ. केतकरांच्या वाङ्मयाला इतर ठरीव निकष लावून चालत नाहीत. केतकरांना त्यांच्याच निकषाने परीक्षिलें पाहिजे. बोधालाहि त्यांच्या वाङ्मयांत स्थान नाही, असें मला निश्चित वाटतें. डॉ. केतकर बोधवादापासून अलिप्त राहिले म्हणूनच प्रसंगनिष्ठ विनोदाची पेरणी त्यांना वाङ्मयांत विपुल करतां आली. पण त्यांच्या विनोदाच्या अनेक अंगांबद्दल गोखल्यांनी कांहीच म्हटलेलें नाही.

डॉ. गोखल्यांनी प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणे ' भांबावणारे परीक्षार्थी विद्यार्थी व त्यांच्या-सारखे इतर जिज्ञासु वाचक ' यांना कदाचित् ' गाइड ' म्हणून हें पुस्तक उपयुक्त ठरेल !

**दुर्गा भागवत**

---

शोकवार्ता :

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे सभासद आणि विख्यात कथालेखक श्री. शशिकांत पुनर्वसु (श्री. मोरेश्वर शंकर भडभडे) हे २४–७–१९५५ या दिवशीं अकस्मात् निधन पावले, हें कळविण्यास आम्हांस अत्यंत दुःख होत आहे. —चिटणीस

---

अनुक्रमणिका

# जगन्नाथ पंडित

जगन्नाथ पंडिताचें जीवन म्हणजे हिंदुस्थानाच्या इतिहासांतलें एक रम्याद्भुत प्रकरण. त्याच्या विद्वत्तेची सूक्ष्मता, कलाविलासाचा वेगळेपणा, दर्पांमध्ये परिणत होऊं पाहणारा अत्यभिमान, मोगली दरबारांतलें स्वैर जीवन, समकालीन विद्वज्जनांशीं झालेली स्पर्धा या गोष्टी कोणत्याहि नवकथेला शोभाव्या अशा आहेत. लेखनामधून प्रत्ययाला येणारें त्याचें ठसठशीत व्यक्तित्व हें संस्कृतज्ञांचें सदाचें आकर्षण होऊन राहिलें आहे. अशा व्यक्तीच्या जीवनाविषयीची कादंबरी व्यक्तिरेखनाच्या दृष्टीने सूक्ष्म, उलटसुलट प्रवाहांनी क्षुब्ध झालेली आणि व्यक्तिजीवनाचा व्यापक अनुभव सांगणारी व्हावी, अशी अपेक्षा स्वाभाविक आहे.

जगन्नाथाविषयी पारंपरिक प्रवाहाने वाहत आलेल्या कथा श्री. दांडेकरांनी पतकरिल्या, यांत विवादाचें कारण नाही. लेखकाने आपलें साहित्य कसेंहि वेचावें. मात्र तें माळतांना त्याचा कस लागल्यावाचून राहणार नाही. जगन्नाथाच्या पारंपरिक कथा या विखुरलेल्या सूचना आहेत. त्यांची सलग रचना करतांना त्यांचा अंतर्गत संबंध दाखविला पाहिजे. किंबहुना, उपलब्ध कथांभोवती नुसतीं मखरें बांधण्याचा प्रयास न करतां त्यांची अंतर्गत, एकजिनसी संगति दाखवून उसाच्या पेऱ्यांप्रमाणे त्या एकीमधून एक निघालेल्या आहेत, असा प्रत्यय वाचकाला आणून दिला पाहिजे.

असें करतांना जीवितांतील बाह्य घटनांपेक्षा त्या ज्यांमधून अंकुरल्या त्या कविमनाच्या सूक्ष्म स्पंदनांचा मागोवा घेणें अधिक कुतूहलाचें होय. जगन्नाथाच्या बाबतींत तर तें विशेषच. जगन्नाथाचा आणि लवंगीचा प्रणय आणि तत्कालीन समाजामध्ये या भिन्नधर्मीयांविषयी झालेली प्रतिक्रिया या गोष्टी या दृष्टीने अतिशय अनुकूल आहेत. परंतु सर्व कादंबरीमध्ये असा प्रयत्न कोठे आढळून येत नाही. जगन्नाथाचें हें प्रकरण कादंबरींत भडकपणाने रंगविलेलें आहे. मध्ययुगीन कालखंडामध्ये आशकमाशुकांचे प्रेमव्यवहार ज्या लिबलिबीत रितीने रंगवीत, तीहून कांही वेगळी रीत श्री. दांडेकरांनी स्वीकारिलेली नाही. ते उन्मादक चंद्रिकाविहार, तीं चोरटीं मीलनें, प्रेमिकांची ती अतिरिक्त अनुरक्ति, तीं भावविवश भाषणें, तीं अतिकोमल शरीरें, तीं अतिसुंदर रूपें, नायकाचे सर्वत्र होणारे ते विजय, तीं त्याचीं पूजनें, तो त्याचा गौरव हीं सर्व तशाच कमल-भृंग-चंद्र-तारकांनी खचलेल्या भावड्या आणि गोलमाल भाषेने वर्णिलेलीं आहेत. अशा भूमिकेमुळे जगन्नाथाचें पत्नीवियोगाचें दुःखहि उथळ व सवंग वाटतें. किंबहुना, जगन्नाथाच्या 'करुणविलासां'तील श्लोकांचा खुलासा करण्यासाठी हा भाग लिहिला की काय, असें वाटतें. वस्तुतः, घटनांमधून, मनाच्या तीव्र स्पंदनांमधून हे श्लोक स्फुरलेले दिसावयास पाहिजेत. तसें होत नाही. कवि हा कलावंत वाटत नाही. आक्रंदक वाटतो. श्लोक हे घटनांच्या चौकटींत बसविलेले वाटतात. हीच गोष्ट कादंबरींत दर्शविलेल्या त्यागाच्या कल्पनेची. ही त्यागकल्पना ठोकळ, सांकेतिक आणि अतिव्याकुल अवस्थेची आहे. संयमाने येणारा उच्च कलोत्कर्ष तींत आढळत नाही. आणि तींतली परम सात्त्विकता त्यामुळे बुळबुळीत झाली आहे.

जगन्नाथ पंडित (ऐतिहासिक कादंबरी) : लेखक गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर : मूल्य २॥ रुपये : प्रकाशक ग. ल. ठोकळ, ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें२ : पृष्ठें १७२

'कवि' म्हणून लेखकाने जगन्नाथांचा जो गौरव केला आहे तो खरोखरच यथार्थ आहे काय ? —— हा प्रश्न जगन्नाथाच्या काव्यपरीक्षणाचा वाटला तरी त्याच्या गौरवाचा येथे गाइलेला उद्‌घोष पाहतां विचारावासा वाटण्यासारखा आहे. जगन्नाथ हा अव्वल दर्जाचा कवि खचित नाही. त्याची पुष्कळ मदार वृत्तप्रभुत्व आणि झुळझुळते शब्द यांवर आहे. कल्पनांच्या नावीन्याचा त्याचा वडिवार हा श्रेष्ठ काव्याच्या निकषाला कितपत टिकेल, याची शंका वाटते. त्यामुळे कादंबरींतील ही बाजू रित्या भांड्याच्या निनादासारखी वाटते.

जगन्नाथाची गंगाभक्ति व सरतेशेवटीं त्याने गंगेंत केलेलें आत्मार्पण यांची त्याच्या पूर्वायुष्याशीं संगति लावणें ही गोष्ट तर अत्यंत दुर्घट आहे. कारण तशा प्रकारचीं चिन्हें त्याच्या पूर्वचरितांत फारच क्वचित् दिसतात,—जवळजवळ नाहीतच. अशा ठिकाणीं तरल कल्पनेवाचून गति नाही. पण तिचें साहाय्य श्री. दांडेकरांनी घेतलेलें नाही, त्यामुळे हा कळसाचा भाग निर्जीव होऊन 'गंगालहरी'च्या कांही श्लोकाची टीका, यापलीकडे त्याला अर्थ उरला नाही. आणि वाचकाच्या मनावर संस्कार उरतो तो असा की, जगन्नाथपंडिताच्या या चरित्रांत 'जगन्नाथ' कुठेच नाही.

अरविंद मंगरूळकर

# परिषद्वार्ता

( चिटणिसांकडून )

**कै. केतकर स्मृतिदिन** : ज्ञानकोशकार कै. श्री. व्यं. केतकर यांच्या स्मृतिदिना-निमित्त रविवार दि. १०-४-५५-ला पुढील दोन कार्यक्रम झाले. सकाळीं ८ वाजतां कै. केतकर यांच्या समाधीला पुष्पांजलि अर्पिण्यांत आली. या प्रसंगीं प्रा. चिं. वि. जोशी, श्री. चिं. ग. कर्वे, प्रा. मंगरूळकर, डॉ. वाळिंबे, श्री. दि. के. बेडेकर, प्रा. ग. प्र. प्रधान, राजकवि यशवन्त, श्री. वा. अ. गरुड इत्यादि उपस्थित होते. संध्याकाळीं ६॥ वाजतां मा. प. सा. मंदिरांत श्री. गोपिनाथ तळवळकर यांचें कै. केतकर यांच्या जीवितकार्याविषयी माहितीपूर्ण व्याख्यान झालें.

**भेटी** : एप्रिल ते जून या तिमाहींत परिषदेस पुढील मान्यवरांनी भेटी दिल्या : श्री. दुर्गा भागवत ( ३०-४-५५ ), साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास ( १-५-५५ ), श्री. शं. वि. जोशी ( ११-५-५५ ), सौ. कमलाबाई किबे ( ३-६-५५ ), श्री. पु. वा. काळे व सौ. अनसूयाबाई काळे ( ८-६-५५ ). परिषदेतर्फे या सर्वांचा यथोचित सत्कार करण्यांत आला व त्यांचेबरोबर परिषदेच्या कार्यकर्त्यांनी विविध विषयांवर चर्चा केली. श्री. दुर्गा भागवत यांच्या भेटींत विशेषत्वानें कै. केतकर यांच्या समाधीच्या दुरुस्तीसंबंधी चर्चा झाली.

**कार्यालयीन सभा** : नव्या कार्यकारी मंडळाची पहिली बैठक ३-४-५५-ला होऊन पदाधिकारी व विविध समित्या यांची निवड झाली. वाङ्मयेतिहासाच्या निर्वाहक मंडळाचे चिटणीस म्हणून प्रा. वा. दा. गोखले यांची निवड झाली. कार्यकारी मंडळाची दुसरी बैठक दि. ५-६-५५—ला झाली. पहिल्या बैठकींत स्वीकृत करून घेतलेले सभासद श्री. न. शे. पोहनेरकर यांनी असंमति दर्शविल्यामुळे त्यांचेऐवजी कार्यकारी मंडळामध्ये प्रा. रा. व. माढेकर यांना स्वीकृत करण्यांत आलें. डॉ. शं. दा. पेंडसे यांनी वाङ्मयेतिहास-योजनेच्या मूळ धोरणानुसार ५००० पृष्ठापर्यंत विस्तृत असावी, अशा आशयाचा जो ठराव मांडला तो अविरोध संमत करण्यांत आला. रविवार दि. ५-६-५५—ला नियामक मंडळ ( अध्यक्ष प्रा. श्री. म. माटे ) व वार्षिक साधारण ( अध्यक्ष सौ. कमलाबाई किबे ) या दोन्हीं सभा झाल्या. १९५४–५५-चें इतिवृत्त जमाखर्च व ५५–५६-चा अर्थसंकल्प दोन्हीं सभांत संमत करण्यांत आले. तसेंच, दोन्ही सभांनी डॉ. शं. दा. पेंडसे यांचा वाङ्मयेतिहास योजनाविषयक उपरिनिर्दिष्ट ठराव अविरोध संमत केला. नियामक मंडळावरील रिकाम्या व स्वीकृत जागांसाठी पुढील नांवें सुचविण्यांत आलीं व तीं सर्वसंमत झालीं — प्रा. श्री. रा. पारसनीस, डॉ. न. का. घारपुरे, श्री. म. दा. साठे, श्री. र. वि. हेरवाडकर, प्रा. शं. या. पोंक्षे, श्री. प. त्र्यं. सहस्रबुद्धे, श्री. न. वि. गाडगीळ, डॉ. वामनराव वाघ, श्री. प्रभाकर पाध्ये, सौ. सुधा जोशी, प्रा. पु. शि. रेगे, प्रा. वा. ल. कुळकर्णी, प्रा. मं. वि. राजाध्यक्ष, श्री. व. त्र्यं. सोनाळकर, प्रा. ल. के. कुलकर्णी, रा. रा. र. लु. जोशी, श्री. भा. शं. कहाळेकर, प्रा. भगवंत देशमुख, श्री. वि. गो. साठे व प्रा. म. श्री. पंडित.

**शाखासभावृत्तांत** : सोलापूर शाखासभेच्या दि. २९–५–५५-च्या वार्षिक साधारण सभेंत नवीन कार्यकारी मंडळाची निवडणूक होऊन पुढीलप्रमाणे पदाधिकाऱ्यांची निवड झाली— अध्यक्ष — डॉ. वि. म. कुलकर्णी उपाध्यक्ष — श्री. मा. गो. काटकर व प्रा. मा. ग. बुद्धिसागर कार्याध्यक्ष — श्री. पं. मा. कामतकर कोषाध्यक्ष — प्रा. कृ. शे. मार्डीकर कार्यवाह — श्री. वसंत शा. वैद्य व सौ. प्रभावती केसकर. याशिवाय कार्यकारी मंडळांत ७ व सल्लागार मंडळांत ४ सभासद आहेत.

# साभार स्वीकार

( ग्रंथनाम, लेखक, प्रकाशक, मूल्य )

१ पडघवली ( कादं.) गो. नी. दांडेकर; मौज प्रकाशन, खटाववाडी, मुंबई ४; ४॥ रु.

२ सौंदर्य आणि साहित्य ( निबंध-संग्रह ) बा. सी. मर्ढेकर; मौज प्रकाशन, खटाववाडी, मुंबई ४; ५ रु.

व्हीनस प्रकाशन, ४१० शनिवार, पुणें २ यांचीं प्रकाशनें —

३ एकनाथवचनामृत – रा. द. रानडे; ४ रु.

४ ब्राह्मणकन्या ( कादं. ) श्री. व्यं. केतकर; ४ रु.

५ नाटयकला-प्रवेश — अ. म. जोशी; ३। रु.

६ मराठी नाटयरचना-तंत्र आणि विकास – वि. द. साठे; अध्यक्ष, साठे स्मारक समिति, व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; ८ रु.

७ कमल-फुलें ( संपा. ) द. न. गोखले, १॥ रु.

८ काळें पाणी ( संक्षिप्त ) वि. दा. सावरकर ( संपा—प्र. न. जोशी ); १॥ रु.

९ दुधाच्या धारा ( संपा. ) द. न. गोखले; १॥ रु.

१० सरस नाटिका – पु. ना. वीरकर; १॥ रु.

११ गाळीव रत्नें ( चिं. वि. जोशी ) ( संपा. द. न. गोखले ); १॥ रु.

१२ मुन्शी प्रेमचंद — प्र. न. जोशी; १॥ रु.

१३ सराई ( संक्षिप्त ) र. वा. दिघे ( संपा. वा. शि. आपटे ); १॥ रु.

१४ शरच्चंद्र चट्टोपाध्याय — प्र. न. जोशी; १॥ रु.

१५ देवकन्या ( कविता ) श्री. रा. देव, कोटावार नदीकाठीं, उस्मानाबाद; १। रु.

१६ खलप ( कालप ) घराण्याचा इति, हास – वा. अ खलप; ना. वा. खलप, विकास-गणेशवाडी, पुणें ४.

१७ ईश्वरी ( नाटक ) ल. वि. वेलदे; जय प्रकाशन, पोटभरे बिल्डिंग, दादर, मुंबई १४; १॥ रु.

१८ भूमिकन्या सीता (नाटक) भा. वि. वरेरकर; पॉप्युलर बुकडेपो, मुंबई ७; २ रु.

१९ लिलीचें फूल ( कादं. ) गंगाधर गाडगीळ; लाखाणी बुकडेपो, मुंबई ४; ३ रु.

२० उत्तम क्रिकेट कसें खेळाल ? — दि. व. देवधर; किर्लोस्कर प्रकाशन, किर्लोस्कर-वाडी ( द. सा. ); ४ रु.

२१ करायला गेलों एक ( नाटक ) बाबूराव गोखले; कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रोड, पुणें २; १॥। रु.

२२ पवनाकांठचा धोंडी ( कादं. ) गो. नी. दांडेकर; कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २.

२३ राष्ट्रपिता महात्मा गांधी (चरित्र) वीर वामनराव जोशी व ना. रा. अभ्यंकर (ना. रा. अभ्यंकर) १४ नावलकर बिल्डिंग, खाडिलकर रोड, मुंबई ४; १५ रु.

२४ मेंदी ( कविता ) इंदिरा; कॉंटि-नेंटल प्रकाशन, टिळक रोड, पुणें २. २ रु.

२५ नवमानवतावाद — मानवेंद्र रॉय, ( अनु. ) प्रा. गोवर्धन पारीख; प्राज्ञपाठशाळा-मंडळ, वाई ( उ. सा. ); २॥ रु.

२६ मराठी छंदोरचना ( लयदृष्टया पुन-र्विचार ) ना. ग. जोशी, स्नेहसुधा, दांडिया बाजार, बडोदें; ९ रु.

२७ महाराष्ट्रांतील राष्ट्रवादाचा विकास — नलिनी पंडित, वांबुळी-निवास, माहीम, मुंबई १६; ५ रु.

२८ वासंती ( कथा ) म. भा. माईणकर, प्रतिभा प्रकाशन, १७ भावेश्वर भुवन, गोखले रोड, दादर-मुंबई २८; २ रु.

२९ सुश्लोकमानस ( श्रीतुलसीदासकृत श्रीरामचरितमानसाचा श्लोकानुवाद ) रा. चिं. श्रीखंडे, मंगळवार पेठ, कोल्हापूर; ५ रु.

३० शिल्पसंसार ( साप्ताहिक, अंक १ ते १७ बांधीव पुस्तक ) संपा. प्रका. ना. वा. गद्रे, ६२४, सदाशिव, पुणें २; ४ आणे-अंक

३१ शब्द ( कविता—मासिक ) संपा. रमेश शं. समर्थ, आनंदाश्रम, ४५ गोखले रोड, नॉर्थ, दादर—मुंबई २८, वा. व. ३ रु.

# आपल्या वाचनालयासाठी

## ललित वाङ्मय

| | | | | |
|---|---|---|---|---|
| मीठ-भाकर | ( काव्य ) | -- | ग. ल. ठोकळ | २-८-० |
| सुगी | ( ,, ) | -- | ,, | ३-०-० |
| गावगुंड | ( कादंबरी ) | -- | ,, | २-०-० |
| कडू साखर | ( कथा ) | -- | ,, | ३-०-० |
| सुगंध | ( ,, ) | -- | ,, | ३-०-० |
| पाहिलें चुंबन | ( ,, ) | — | ,, | ३-०-० |
| मोत्यांचा चारा | ( ,, ) | — | ,, | २-४-० |
| अंजनी | ( कादंबरी ) | — | के. नारखेडे | ४-०-० |
| सराई | ( ,, ) | — | र. वा. दिघे | ५-०-० |
| आजकालचे विद्यार्थी | ( प्रबंध ) | -- | श्री. म. माटे | २-८-० |
| साहित्यधारा | ( ,, ) | -- | ,, | २-८-० |
| प्रौढांचें शिक्षण व साक्षरताप्रसार | ( प्रबंध ) | | आ. अ. मानकर | १-८-० |
| साहित्यदर्शन | ( आधुनिक वाङ्मयप्रकार ) | — | सरोजिनी बाबर व वि. म. कुलकर्णी | ४-०-० |

## चरित्र-वाङ्मय

| | | | | |
|---|---|---|---|---|
| आजच्या गोष्टी, | भा. १ | — | के. नारखेडे | १-०-० |
| ,, ,, | भा. २ | — | ,, | १-०-० |
| ,, ,, | भा. ३ | — | ,, | १-०-० |
| जगाचे प्रवासी, | भा. १ | — | श्री. म. माटे | १-४-० |
| ,, ,, | भा. २ | — | ,, | १-४-० |
| ,, ,, | भा. ३ | — | ,, | १-४-० |
| मानवतेचे पुजारी, | भा. १ | — | ना. ध. पाटील, | १-८-० |
| ,, ,, | भा. २ | — | ,, | १-८-० |
| ,, ,, | भा. ३ | — | ,, | २-०-० |
| ,, ,, | भा. ४ | — | ,, | २-०-० |
| वीर विनायक | | — | वा. गो. देशपांडे | २-०-० |
| महात्मा फुले | | — | ए. के. घोरपडे | १-१२-० |
| कर्मवीर भाऊराव पाटील | | — | ,, | २-४-० |
| अहल्याबाई होळकर | | — | वा. दा. गोखले | ०-१२-० |
| बारा शास्त्रज्ञ | | — | श्री. म. माटे | ३-८-० |

**लेखन वाचन भांडार, लक्ष्मी रोड, पुणें २.**

मुद्रकः—म. ना. चापेकर आर्यसंस्कृति मुद्रणालय १९८/१७ सदाशिव पुणें २.
प्रकाशकः—अ. गं. मंगरूळकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक-रस्ता पुणें २.

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका







